लक्ष देतील, तितकें त्यांत त्यांचें व रोग्यांचें हित आहे, ही गोष्ट मी कोणास सांगावयास पाहिजे असें नाहीं, तथापि क्वचित् प्रसंगीं असल्या धंद्याचे कांहीं लोकांकडून जें तुटक व अयोग्य वर्तन घडतें, त्यामुळें रोग्याची व रोग्याचे माणसाची निराशा व नाखुषी होते."

"रोगनिरसन हें जसें वैद्यशास्त्राचें काम आहे, त्याचप्रमाणें आरोग्य-संरक्षण हेंही वैद्यकाचेंच एक महत्त्वाचें काम आहे. ही आरोग्यरक्षणाची तजवीज आमचे धर्मशास्त्रकारांनीं इतकी उत्कृष्ट लावून ठेविली आहे कीं, तशी इतर धर्मांत क्वचितच असेल."

"आपला सनातन भारतधर्म म्हणजे मूर्तिमंत आरोग्यशास्त्रच आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आपल्या धर्मगुरूंनीं आपल्यासाठीं जी दिनचर्या लावून दिली आहे, खाद्य, पेय, आहार, विहार, स्पर्शास्पर्श वगैरे संबंधीं जे निर्बंध घालून दिले आहेत ते अत्यंत धोरणाचे व शहाणपणाचे आहेत, असें कोणाही विचारी पुरुषाचे लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. वरवर पहाणारास जे धर्मविधि अप्रयोजक व निरर्थक वाटतात ते परिणामीं आरोग्यदायक व कल्याणकारक असतात, अशी विचाराअंतीं खात्री झाल्यावांचून रहाणार नाहीं. ह्याप्रमाणें इहपरलोकीं आपलें हित साधून देणारा आपला त्राता जो सनातन धर्म त्याचें उज्वल स्वरूप सर्वांस नीट समजविण्यासाठीं चोहोंकडे धर्मशिक्षण सुरू झालें पाहिजे. त्यासाठीं धर्मकार, मुमुक्षुकारांसारख्या लेखकांनीं पुढें सरसावलें पाहिजे. विद्वान व अधिकारी माणसांकडून पुराणें, हरिकीर्तनें, प्रवचनें ठिकठिकाणीं सुरू झालीं पाहिजेत. वेदपाठशाळा जागोजाग निघाल्या पाहिजेत. हल्लीं विदेशी लोकांनीं आपले देशांत येऊन आपणास धर्मशिक्षण देण्यास सुरुवात करावी, व आपलेकडील विद्वानांनीं परदेशीं जाऊन

आपल्या धर्माचें शिक्षण विदेशीयांस देत बसावें, याहून ती आश्चर्य-कारक गोष्ट कोणती !"

"ही स्थिति बदलावी, आपलेपण आपणास समजावें, त्याचा आपणास अभिमान वाटावा, आपण पूर्णपणें स्वधर्मानुयायी होऊन सदाचारी व सशक्त व्हावें, असा आज येथें भरलेल्या संस्थांचा हेतु आहे. आपले अंगांत जर नीतीचें बळ नाहीं, मनगटांत जोर नाहीं व धर्माचा पाठिंबा नाहीं, तर आपले हातून कोणतेंही महत्कृत्य होणें शक्य नाहीं, हें आपण पूर्णपणें लक्षांत बाळगून चाललें पाहिजे व ह्यासाठींच ह्या संस्था निर्माण झाल्या आहेत. त्यांचे कार्याची दिशा आपणांस आतां यापुढें दोनतीन दिवस होणाऱ्या भाषणांतून व प्रदर्शनावरून समजेलच."

"श्रोतृजनहो, याप्रमाणें आज येथें होणाऱ्या निरनिराळ्या सभांसंबंधीं व त्यांनीं हातीं घेतलेल्या विषयांसंबंधीं मीं थोडक्यांत दिग्दर्शन केलें. याप्रमाणें पाहुण्यांची माहिती दिल्यानंतर यजमानानें आपलीही माहिती थोडक्यांत सांगणें हें शिष्टाचारास जरूर आहे. व त्यास हल्लींच्या समारंभांत हा एकच समय आहे; म्हणून ती माहिती देण्याकरितां आपले परवानगीनें मी आपला आणखी थोडा वेळ घेत आहें. तरी तिकडे आपण आतांपर्यंत दिलेंत तसें लक्ष द्याल अशी आशा आहे."

"पनवेल येथील **श्रीधूतपापेश्वर आरोग्यमंदिर** संस्था स्थापन होऊन आज सुमारें ३० वर्षें झालीं. ह्या संस्थेचे मूळ उत्पादक आमचे पूज्य तीर्थरूप कैलासवासी कृष्णशास्त्री पुराणिक, त्याचप्रमाणें आमचे एक कनिष्ठ बंधु कैलासवासी बापुराव पुराणिक हे आजचा हा महोत्सव पाहण्यास, हयात असते तर त्यांस केवढा आनंद झाला असता ! परंतु ईश्वरी घटनेपुढें कोणाचाच इलाज नाहीं, असें म्हणून

स्वस्थ बसावें लागतें. असो. आजपर्यंत विशेष कोणाचें सहाय्य नसतां आज ही संस्था ज्या नांवारूपास आली आहे, ती श्रीधूतपापेश्वर महाराजांची कृपा व श्रीसद्गुरूंचा आश्रय याच जोरावर आली आहे. अर्थात् गत गोष्टींबद्दल शोक करीत न बसतां आज जो या संस्थेस दिवस दिसला, त्याबद्दल कृतज्ञता बुद्धीनें त्या दयाघन परमेश्वराचे आभारच मानले पाहिजेत. या संस्थेचा पूर्व इतिहास सांगून आपला वेळ न घेतां आजची स्थिति आपणांस थोडक्यांत सांगतों. ह्या संस्थेच्या अनेक पोटशाखा आहेत, त्यांपैकीं आज विशेष महत्त्वाची शाखा म्हटली म्हणजे आर्यौषधि कारखाना ही होय. पूर्वीं वैद्य लोकांस राजाश्रय मिळत असे; व राजे किंवा धनिक लोक यांचें साह्यानें प्राचीन काळचे वैद्यांस नाना प्रकारचीं बहुमोल औषधें तयार करण्यास सांपडत असत; परंतु तो मनु आतां पालटला. गेल्या शेंदीडशें वर्षांत इंग्रजी विद्येचा फार मान वाढला, त्यामुळें बडे लोक वैद्यांस विचारीनासे झाले; व त्यामुळें वैद्याजवळ चांगलीं चांगलीं बहुगुणकारी औषधें राहिलीं नाहींत. आयतीं तयार केलेलीं इंग्रजी औषधें वापरण्याकडे लोकांचीं प्रवृत्ति होऊं लागली व अशा रीतीनें परकीय औषधांचा मोबदला घेऊन द्रव्याचा प्रचंड ओघ परदेशाकडे वाहूं लागला; शिवाय इंग्रजी औषधांचे रूपानें आपले धर्मानें निषिद्ध मानलेले पदार्थ गरजू लोकांस निरुपायानें सेवन करावे लागून धर्मभ्रष्टता वाढत चालली. ह्यास उपाय म्हटला म्हणजे आर्यौषधि शास्त्रोक्त रीतीनें मोठ्या प्रमाणावर तयार करून त्या सवलतीनें विकणें हा एकच होता. व त्याच हेतूनें हा कारखाना स्थापन केला. अशा प्रकारच्या कारखान्यामुळें कांहीं वैद्यांचे पोटावर पाय येतो असें कोणाचें म्हणणें आहे, परंतु तो केवळ भ्रम आहे. कारण कोणतेंही औषध एखाद्या वैद्यास तयार करण्यास जितका

खर्च लागेल, त्याहून कमी किंमतीस तें त्यास पुरविण्यास कारखान्यास परवडतें; यामुळें यांत वैद्यांचें नुकसान होण्याचा मुळींच संभव नाहीं. आमचेकडून घेतलेल्या औषधांचे किंमतीवर वैद्यास कमींत कमी चौपटपासून दसपटही पैसे मिळूं शकतील. आतां येथील औषधिक्रियेबद्दल ज्या कोणास प्रश्न अगर संशय असेल, त्यांनीं येथें येऊन ते फेडून घ्यावे. मनुष्याची कृति निर्दोष आहेच आहे असा कोणासच अभिमान धरतां येणार नाहीं. यासाठीं सर्व विद्वान् व आस्थेवाईक वैद्यराजांस व डॉक्टरांस आमची अशी आग्रहाची विनंति आहे कीं, त्यांनीं ही संस्था आपलीच आहे असें समजून, ज्या कांहीं सूचना करणें योग्य दिसेल, त्या कळविण्याची त्यांनीं अवश्य कृपा करावी, त्यांचा आह्मीं मोठ्या आनंदानें विचार करूं. असो. याप्रमाणें पूर्वींचा संबंध केवळ वैद्य या नात्यानें असून ही आर्यौषधि कारखान्याची संस्था आज ३० वर्षें अबाधित चालली; व कळविण्यास आनंद वाटतो कीं, ती उत्तरोत्तर ऊर्जितावस्थेस येत आहे. आज हिंदुस्थानांत येथील औषधें पुष्कळ ठिकाणीं विक्रीस आहेत व शिवाय परदेशांतही क्वचित् प्रसंगीं तीं औषधें पाठविण्यांत येतात."

"**आयुर्वेदपाठशाळा** ही या संस्थेची दुसरी पोटशाखा सुमारें बारा वर्षांपूर्वीं याच दिवसांत स्थापन् झाली होती; परंतु प्लेगची सांथ सुरू झाल्यापासून परगांवचीं मुलें येथें ठेवणें धोक्याचें वाटूं लागलें, व त्यामुळें ती शाळा तूर्त लहान प्रमाणावर आहे. तरी अनुकूल परिस्थिति प्राप्त होतांच पाठशाळा सुरू करण्याचा आमचा विचार आहे. येथील पाठशाळेंत तयार झालेल्या विद्यार्थ्यांस आयुर्वेदाचें नुसतें शाब्दिक ज्ञान न होतां त्यांस औषधिप्रक्रिया, वनस्पतींची ओळख, रोगनिदान वगैरेंची प्रत्यक्ष माहिती होते, हें कारखान्याचें स्वरूप व तेथील

व्यवस्था लक्षांत आणतां आपले ध्यानांत येईल. ही शाळा येथें पूर्ववत् चालू होईपर्यंत उत्तेजन देण्यासारखी अशा प्रकारची संस्था जेथें असेल तेथें बक्षिसादाखल कांहीं देणगी देण्याचें कोणी सुचविल्यास त्याचा आह्मी अवश्य विचार करूं.असो.मुलांचे आरोग्यवृद्धीकरितां आम्ही येथें एक छोटेखानी "श्रीधूतपापेश्वर व्यायाम शाळा" काढली आहे व तींतील मंडळीस कारखान्याचे वैद्य वे० शा० संपन्न दांडेकर शास्त्री हे प्रत्यहीं तालीम शिकवीत असतात."

"श्रीधूतपापेश्वर मुद्रणालय ही या संस्थेची आणखी एक शाखा आहे. आर्यवैद्यकावरील जुने अप्रसिद्ध ग्रंथ प्रसिद्ध करणें, विद्वान व अनुभवी लेखकांनीं चिकित्सेवर वगैरे लिहिलेले ग्रंथ प्रसिद्ध करणें, त्याचप्रमाणें धर्मसंबंधीं, ज्योतिषसंबंधानें चांगले चांगले ग्रंथ प्रसिद्ध करणें, हा ह्या मुद्रणालयाचा एक मुख्य हेतु आहे, व आपल्या सारख्या विद्वानांच्या सहाय्यानें तो हेतु सिद्धीस जाईल अशी पूर्ण उमेद आहे. हल्लीं या छापखान्यांत कारखान्याचेंच किरकोळ काम छापून निघत असून शिवाय श्रीधूतपापेश्वर पंचांग, पथ्यापथ्यविचार, वैद्यकीय चातुर्य, धूतपापेश्वर गंगामहात्म्य वर्णन वगैरे पुस्तकेंही छापून निघालीं आहेत. या छापखान्यासच नवे टाईप पाडण्याची एक फाऊंडरी जोडली आहे."

"ह्याप्रमाणें आज ह्या संस्थेची स्थिति आहे. ह्या पुढील सुधारणा आज जरी कल्पनासृष्टींतच आहेत, तरी आपलेसारख्यांचे सहाय्यानें व प्रोत्साहनानें त्या लवकरच अनुभवसिद्ध होतील, अशी उमेद आहे. नाना प्रकारच्या वनस्तींची योग्य वाढ होते कीं नाहीं तें पाहण्याकरितां, व विद्यार्थ्यांस ह्याची ओळख करून देण्याकरितां व कारखान्याच्या उपयोगाकरितां, येथें एक लहानशी वनस्पतींची बाग ( बोटानिकल गार्डन ) तयार करण्याचा हेतु

आहे. ह्याचप्रमाणें औषधोपचारासाठीं येथें येणारे रोग्यांची संख्या उत्तरोत्तर वाढत असल्यामुळें अनुकूल परिस्थिति येथांच एक **रुग्ण-शाळा** व **आरोग्यशाळा** बांधावयाच्या आहेत. ह्यांची उपयुक्तता निराळी सांगावयास नकोच. व त्याचप्रमाणें या संस्थेचें दैवत **श्रीधूतपापेश्वर** महाराज यांचें एक विस्तृत मंदिर या शाळांचे जवळपासच चांगल्या रमणीय ठिकाणीं बांधून त्याचेच सभोंवार, पुष्पवाटिका व विद्वान संतसज्जनांकरितां आश्रम बांधावयाचे आहेत."

"अध्ययन, अध्यापन व ईश्वरचिंतन यांतच सर्व कालक्षेप करण्याचा ज्यांचा निर्धार झालेला आहे अशा ब्रह्मवृंदांतील विद्वान व पवित्र अशा पुरुषांनीं **श्रीधूतपापेश्वराचे** सन्निध राहून महाराजांचे संस्थेच्या वतीनें नित्य पूजन, अर्चन करावें, फावल्या वेळांत पाहिजे तर अध्ययन, अध्यापन् करावें आणि त्यांचा एकंदर चरितार्थ संस्थेनें चाल-वावा, असा आमचा मनोदय आहे. तो सिद्धीस नेण्यास श्रीधूतपापेश्वर महाराज समर्थ आहेत. अशा रीतीनें सनातन भारतधर्म मंडळ, ब्राह्मण-सभा, व वैद्यक संमेलन व प्रदर्शन हीं येथें कायमचींच एके ठिकाणीं जोडलीं जावींत असा आमचा हेतु आहे. आमचे समजुतीनें ह्याकरितां जे जे यत्न करावयास पाहिजेत ते ते आम्हीं चालविले आहेत, हें आप-णास या संस्थेच्या आजच्या स्थितीवरून दिसून येईलच. एका मनु-ष्याचे हातून जेवढें कांहीं होणें शक्य होतें तेवढें आज बहुतेक सिद्ध झालें आहे. यापुढील बेत सिद्धीस नेणें एकाचें काम नाहीं. त्यांत आपल्यासारख्यांचें अवश्य साहाय्य पाहिजे आहे. विद्वान ब्राह्मण, विद्वान व अनुभवी वैद्य, चौकस, शोधक व होतकरू डॉक्टर, उत्तम शिल्पकार अगर कारागीर ह्याप्रमाणें सर्व दर्जाचे विद्वान व गुणी लोकांची आम्हांस उणीव आहे. येणारे गृहस्थांनीं संस्थेचें हित साधावयाचें हा शुद्ध हेतु धरून काया, वाचा, मनद्वारा साहाय्य

करावें म्हणजे त्यांची योग्य सोयही संस्था करील. एक गोष्ट ह्यांत विशेष मुद्याची सांगावयाची आहे. ती ही कीं ह्या संस्थेचा उगम स्वार्थबुद्धींतून झालेला नाहीं. व आजही ह्याचे मुळाशीं स्वार्थबुद्धि नाहीं. योग्य समय प्राप्त झाल्यावर ही श्रीधूतपापेश्वर महाराजांची संस्था आपलेच स्वाधीन व्हावयाची आहे. तेव्हां आपले-पणानें हिचेवर आजपासूनच आपण प्रेम ठेवाल, व हिजविषयीं आस्था बाळगाल अशी मला पूर्ण आशा आहे. व सनातनभारतधर्म-महापरिषद्, वैद्यक संमेलन, ब्राह्मण महासभा, वैद्यक प्रदर्शन, या संस्थांस या सालीं पनवेलीस आमंत्रण देण्यांतील आमचा हेतु हाच होय कीं आम्हीं आज पंचवीस वर्षांचे परिश्रमानें जें कांहीं केलें आहे तें आपलेसारखे विद्वानांचे नजरेखालीं घालावें व त्यासंबंधीं आपलेकडून योग्य सूचना व सहानुभूति मिळवावी. ह्यासाठीं वरील मनोगत संकोचवृत्ति सोडून आपणांस उघड करून सांगितलें आहे. त्यांत आमचेकडे आत्मश्लाघेचा दोष कोणी देणार नाहींत अशी आम्हांस आशा आहे."

"सद्गृहस्थहो, मला काय सांगावयाचें तें मीं सांगितलें. येथें आज आलेल्या विद्वान पाहुण्यांस आमची ओळख करून दिली व त्यांची श्रोतृजनांस ओळख पटविली. या महोत्सवाचे उद्दिष्ट कार्याचें थोडक्यांत दिग्दर्शन केलें. हा महोत्सव आतां चार दिवस सुरू राहील. त्या वेळीं विद्वान पंडितांचीं माहितीनें भरलेलीं अशीं भाषणें होतील. प्रदर्शनांत आपणांस नाना प्रकारच्या आर्यौषधी पहावयास सांपडतील व सर्वांत मोठा लाभ म्हणजे एरवीं आपणांस दुर्लभ अशा संतसज्जनांच्या व विद्वान् पंडितांच्या अनायासें भेटी घेण्यास सांपडतील. सारांश, या महोत्सवांत आपणांस अनेक अलभ्य लाभ होणारे आहेत. एखाद्या आर्त मुमुक्षूप्रमाणें आपली मात्र तयारी असली पाहिजे. इतकें आपणांस

सुचवून व माझें हें स्वागतपर भाषण सर्वांनीं शांत चित्तानें ऐकलें, याबद्दल पुनः सर्वांचे आभार मानून आरंभलेलें कार्य निर्विघ्नपणें शेवटास न्यावें अशी श्रीधूतपापेश्वर परमेश्वराची प्रार्थना करून मी आपला निरोप घेतों."

या स्वागतपर भाषणानंतर रीतसर सूचना अनुमोदन झाल्यावर टाळ्यांच्या गजरांत त्या दिवसाचे अध्यक्ष शेट त्रिभुवनदास मंगळदास, जे. पी. व बाँबे युनिव्हर्सिटीचे फेलो, हे भाषण करावयास उठले. त्या वेळेस त्यांच्या गुजराथी भाषणाच्या छापील प्रती व फोटो, हीं वांटण्यांत आलीं.

तदनंतर सर्व मंडळी बागेंतून निघाली आणि कारखान्यांतील ईशान्य बाजूच्या नव्या इमारतींत प्रदर्शनाच्या वस्तू मांडल्या होत्या, तेथें गेली व अध्यक्षांच्या हस्तें प्रदर्शन उघडण्याचा समारंभ झाला.

## प्रदर्शनांतील वस्तु

प्रदर्शनमंडपांत शिरल्याबरोबर प्रथमच समोर ठेवलेली 'श्रीधूतपापेश्वराची' ७ फूट उंचीची भव्य व सुंदर तसबीर, आणि श्री. विंचूरकर, पुराणिक पितापुत्र, निरनिराळ्या पोझिशनमधील सँडो, श्रीमच्छंकराचार्य-गंगामठ, ह्यांच्या तसबिरी नयनास फार आल्हाद देत होत्या. दुतर्फा प्रदर्शनांतील परोपरीच्या वस्तु सुंदर व्यवस्थेनें लाविल्या होत्या. त्यांतील कांहीं येथें सांगतों:—

१ डमरु वगैरे यंत्रांचे नमुने.

२ सुक्या व ओल्या वनस्पति-ह्यांत ठिकठिकाणच्या पुष्कळ सुक्या व ओल्या वनस्पति फार पाहण्यारख्या होत्या. राजापूर येथील सुप्रसिद्ध गृहस्थ रा. गोविंद मोतिराम शेट सांपळे, ह्यांनीं एकट्यांनीं १०५ वनस्पति आणिल्या होत्या. ह्या गृहस्थाचे परिश्रम व शोधकबुद्धि फार वाखाणण्यासारखी आहे.

३ रबराचीं झाडें—हीं आमच्या लोकांस अगदीं नवीनच पाहण्यासारखी पर होती.

४ वनस्पतिजन्य पदार्थ, खनिज पदार्थ व प्राणिजन्य पदार्थ, परिप्रकारचे मांडलेले होते.

५ पारा, पोंवळ्यांचीं झाडें, मोत्यांचे शिंपलें, मोतीं, शंख, रसायनें, भस्में, मोडाचीं शिंगें, सुवर्णमुखी खडे, अभ्रकाचे नमुने, कृष्णाभ्रक वगैरे.

६ मात्रा, रसायनें, तेरा प्रकारचे रससिंदूर, अरिष्टें, आंसवें, मलमें; वैद्यकीचीं पुस्तकें; डब्या वगैरे करण्याचीं, वनस्पती गाळण्याचीं व कापण्याचीं यंत्रें; खल, बत्ते वगैरे फार पाहण्यासारख्या वस्तू होत्या.

७ वडाच्या सालींचें-वस्त्र अर्थात् वल्कल. ही चमत्कारिक वस्तु अत्यंत प्रेक्षणीय होती.

८ पत्रावळी—प्रदर्शनांत ‘ पत्रावळी ’ होत्या, हें ऐकून कित्येकांस मोठें आश्चर्य वाटेल. परंतु ह्या पत्रावळी खरोखरच प्रेक्षणीय होत्या. ह्यांत टांके देतांना अशी मौज केलेली होती कीं, त्यांतून सुंदर सुंदर कमळें, अक्षरें वगैरे फार उत्तम साधलेलीं होतीं.

कारखाना पाहण्याकरितां संमेलनांतील मंडळी जेव्हां गेली, तेव्हां अनेक प्रकारच्या औषधांच्या बाटल्यांच्या राशींच्या राशी त्यांच्या नजरेस पडल्या. त्या पाहून त्यांस अतिशय आनंद व आश्चर्य वाटलें व कारखान्याचे उत्पादक कै. तात्यासाहेब पुराणिक यांस त्यांनीं धन्यवाद दिले. व असा प्रचंड पण सुयंत्रित कारखाना साऱ्या महाराष्ट्रांत नाहीं, असे त्यांच्या तोंडून उद्गार निघाले.

एकंदरींत पनवेल गांव लहानसा व प्रयत्न पहिलाच असून त्या मानानें हें वैद्यकीय प्रदर्शन चांगलेंच झालें, असें म्हटलें पाहिजे.

प्रदर्शनमंडपाचें काम व दिव्याची रोषनाई फार उत्कृष्ट होती. दुसरे दिवशीं दोन प्रहरीं दोन वाजतां पुन्हां वैद्यक संमेलन भरलें. तेव्हां डॉ. भालचंद्र, सांडू ब्रदर्स वगैरे ज्या गृहस्थांकडून सहानुभूतिपर पत्रें आलीं होतीं, तीं वाचून दाखविण्यांत आलीं. नंतर अध्यक्षस्थानीं आयुर्वेदविद्यानिधि, पंडित गंगाधरशास्त्री जयपूरकर, वैद्यकपाठशाळेचे अध्यापक, ह्यांची सर्वानुमतें योजना झाली. नंतर कांहीं वैद्यांनीं निबंध व भाषणें वाचलीं. त्यांत पनवेल येथील प्रसिद्ध वैद्य दादाशास्त्री शेंडे, ह्यांनीं एक निबंध वाचिला. त्यांत प्रसूतिशास्त्र व जननशास्त्र ह्यांचें ज्ञान पाश्चात्य वैद्यकामध्यें अधिक आहे. तसें ज्ञान आपल्या वैद्यकांत असल्याचें मला पूर्वीं कळलें नव्हतें, अशा आशयाचें कांहीं भाषण वाचलें. त्यांचें वाचन पुरें होतांच धुळेकर वैद्य वाळिंबेशास्त्री हे फारच विरुद्ध भाषण बोलूं लागले. ते आपल्या वैद्यकाच्या अभिमानांत इतके गर्क झाले होते कीं, त्यांनीं बराच वेळपर्यंत सभ्यपणा बाजूस ठेवला, म्हटलें तरी चालेल. अशा प्रकारचे प्रसंग शास्त्रज्ञ मंडळीनीं येऊं देणें नीट नव्हे.

नंतर फोटो घेण्यांत आले. फोटो घेऊन झाल्यानंतर त्रिदोषसिद्धांतावर कित्येक विद्वान् वैद्यांचीं भाषणें होऊन काम पुरें झालें.

ता. १९ रविवारीं सकाळीं सोलापूरचे प्रसिद्ध डॉक्टर रानडे, भिषग्विलासकर्ते, ह्यांचें आरोग्यशास्त्रावर फार सुरेख व्याख्यान झालें. नंतर प्राणाचार्य बाळशास्त्री लागवणकर, ह्यांचेंही त्रिदोष सिद्धांतावर अत्यंत सुश्राव्य व्याख्यान झालें. ता. २० सोमवार रोजीं सायंकाळीं खालील गृहस्थांचीं वैद्यकविषयावर भाषणें झालीं.

१ भोगीलाल त्रिकमलाल ( लेख वाचला. ) १ डॉ. नारायण सखाराम वैद्य, कवठें ( सांगली ), १ वै. पं. आनंदराव नारायण रेगे, जाहागीरदार, अजनास इंदूर ( लेख वाचला ) १ रा. रा. गोविंद मोतिराम शेट सापळे.

( राजापूर ) १ डॉ. हकीम महंमदखान याकूबखान ( मुंबई ), १ पं. लक्ष्मण विठ्ठल–कल्याण ( हिंदींत ).

ह्यांत रा. गोविंद मोतिराम शेट सांपळे, ह्यांचें भाषण सध्यांची वैद्यांची स्थिति व वैद्यकाची स्थिति सुधारण्यास पुढें काय केलें पाहिजे, त्यासंबंधानें फारच विचार करण्यासारखें झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

संमेलनास लोक १५०–२०० पर्यंत बाहेरगांवाहून आलेले होते. चारही दिवस भोजनाचा थाट उत्तम प्रकारचा होता. एक उणीव कांहीं लोकांस भासत होती. ती कोणती म्हणाल तर पाहुण्यांकरतां चहाकॉफीची व्यवस्था ठेविली नव्हती. पण त्याचेबदला रोज नवे तयार केलेले लाडू सकाळच्या अल्पाहाराकरतां मंडळीस देण्यांत येत असत.

सकाळीं शौच, मुखमार्जन, स्नानसंध्या, पूजादि कर्मे करून मंडळी मोकळी झाली कीं ते आहारगृहाकडे येत असत. तेथें इच्छेप्रमाणें पाणी पिण्यापुरता एखाद् दुसरा लाडू खाऊन परत आपआपल्या नियमित जागीं येऊन बसत. सकाळीं कांहीं खासगी वैद्यकीय विषयांची चर्चा आलेले विद्वान लोक करीत; नंतर भोजनोत्तर थोडी वामकुक्षी झाल्यावर संमेलनाकरतां तयार केलेल्या मंडपांत येऊन बसत. व व्याख्यानास सुरुवात होई. तसेंच मागाहून व्याख्यानांतील विषयाबद्दल थोडी भवति न भवतिही होत असे. असो, याप्रमाणें चार दिवस महोत्सव झाल्यानंतर पाहुणे मंडळी आपआपल्या गांवास जाण्याच्या तयारीस लागली. त्यावेळीं लांबच्या गांवांहून जे मोठे नामांकित वैद्य आले होते त्यांस कै. तात्यासाहेब यांनीं मौल्यवान वस्त्रें देऊन सन्मान केला. कोणास प्रवासखर्चही

दिला. आलेल्या मंडळीस प्रवासखर्चाशिवाय दुसऱ्या कोणत्याही बाबतींत खर्च करण्याची जरूरी नव्हती.

. संमेलनाकरतां कै. तात्यासाहेब यांनीं स्वतः एकट्यांनीं हजार दीड हजार रुपयेपर्यंत तरी खर्च केला असावा असें वाटतें. हेतु हा कीं, आपला कारखाना देशोदेशींच्या वैद्यांस तसेंच आयुर्वेदप्रेमी गृहस्थांस प्रत्यक्ष पहावयास सांपडावा. या संमेलनानें कै. तात्यासाहेब यांस अप्रत्यक्ष फायदा फार झाला. तो कसा म्हणाल तर पूर्वीं जेथून औषधांची मागणी येत नव्हती अशा ठिकाणांहून मागणीस सुरुवात झाली. कारखाना पाहून गेलेल्या वैद्यांनीं व इतर आयुर्वेदप्रेमी सद्गृहस्थांनीं जेव्हां कारखाना उत्तम आहे असें आप्तेष्टांना स्वतः होऊन सांगितलें तेव्हां लोकांचा कारखान्यावर जास्तच विश्वास बसला. या वैद्यक संमेलनांमुळें पनवेल येथील आर्यौषधी कारखान्याची कीर्ति चोहोंकडे पसरली व त्यामुळें औषधांच्या मागण्या फार येऊं लागल्या. बहुधा असा नियमच कीं कै. तात्यासाहेब जी गोष्ट करीत ती त्यांचे आप्त व मित्र मंडळीस मनापासून आवडत नसे. तात्यांची दृष्टि सामान्य लोकांप्रमाणें संकुचित नसून ते जें कांहीं कृत्य करीत त्यापासून तूर्तातूर्त फायदा काय होईल या गोष्टीकडे न पाहतां त्यांतील उच्च तत्त्वाकडे व भविष्यत्कालीं होणाऱ्या फायद्याकडे बघत असत. पूर्वीं सन १८९६ सालीं मुंबई, पुणें वगैरे ठिकाणीं तात्यांचीं प्लेगवरचीं कालकूट, संजीवनि, मृत्युंजय वगैरे औषधें, उपयोग कसा करावा वगैरे माहितीच्या छापील पत्रकांसह वैद्य लोकांकडे मोफत रवाना केलीं होतीं व त्यांचा उपयोग करण्याबद्दल त्यांस विनंति करण्यांत आली होती. यामुळें कारखान्याबद्दल जनतेमध्यें पूज्य बुद्धि उत्पन्न झाली. जें काम हातांत घ्यावें त्यांत कै. तात्यासाहेबांना यशच येत असे.

त्यांच्या दीर्घ प्रयत्नांना उज्वल अशा भाग्याचें पाठबळ असल्यामुळें ते सर्व सिद्धीस गेलें; हार अशी खावी लागली नाहीं.

अशा तऱ्हेचे योग वारंवार येणारे नसतात. पण ते वारंवार आणण्याची, आमच्या भिषग्वर्यांस प्रेरणा झाली, हें आर्यवैद्यकाचें महद्भाग्य व परमेश्वरी कृपाच होय. अशा तऱ्हेच्या संमेलनांनीं अनेक प्रकारचे फायदे होणार आहेत. असो अशा प्रकारें हें वैद्यक संमेलन व प्रदर्शन फार उत्तम रीतीनें तडीस गेलें, ह्या सर्वांचें श्रेय श्रीधूतपापेश्वर आरोग्यमंदिराचे प्रतिनिधि, भिषग्चूडामणि, रा. रा. विष्णु कृष्णशास्त्री पुराणिक, यांजकडे व तसेंच अंशतः आयुर्वेद-महामहोपाध्याय, रा. शंकर दाजी शास्त्री पदे, यांजकडे आहे.

**वैद्यक संमेलन तें होतां थाटांत यापरी पुरतें ।**
**पुर तें उदास झालें निष्प्रभ दिसती समस्त गोपुर तें ॥१४१॥**

पद्यचरित्र.





# प्रकरण २७ वें.

## इतर उद्योग आणि चळवळी.

लहान थोर काम कांहीं ।
केल्यावांचुन होत नाहीं ॥ समर्थ.

वडिलांच्या पश्चात् तात्यांनीं आर्यौषधि कारखान्याव्यतिरिक्त जे अवांतर उद्योग व चळवळी केल्या त्यांची माहिती या प्रकरणांत संकलित करीत आहें. ता. २५ जुलै सन १९०६ चे पत्रांत त्यांनीं विजय प्रेस, नेटिव प्रेस व तिसरा एक प्रेस असे दहा हजार साहाशें पन्नास रुपयांस घेतल्याचें कळविलें. व त्याच वेळीं टाईप पाडणारा एक कारागीर चव्हाण यासहि आश्रय देऊन लवकरच सन १९०७ चे आरंभीं त्यांनीं आणखी एक कल्याणीचा छापखाना व फाउंड्रीहि विकत घेतली. तात्यांना थोडें आवडत नसे. त्यांच्या हातीं पैसा वाढूं लागला, तसतसें त्यांचें धंद्यांतील साहसहि फार वाढूं लागलें.

विजय प्रेस प्रथम गहाण घेतल्यानंतर त्यांत त्यांनीं आपलें नवें श्रीधूतपापेश्वर संस्थेचें पंचांग छापण्यास दिलें. त्या वेळीं वसईचे पुरंदरे व मोघे ह्या दोघांचीं पंचांगें या बाजूस प्रचारांत असत. त्यांपैकीं पुरंदरे यांचें पंचांग लघुचिंतामणीवरून तयार होत असे व

मोघे हे बृहत्चिंतामणीवरून पंचांग तयार करीत. तात्यांना गृहलाघवीय रविचंद्र रोजचे स्पष्ट करून त्यावरून येणारी तिथी पाहिजे होती. त्या पंचांगांत दहा प्रकारचे मुहूर्त जास्त दाखविले आहेत. याशिवाय त्या पंचांगाचा जो विशेष त्यासंबंधीं वीस एकवीस मुद्दे पंचागाच्या प्रस्तावनेंत दिले आहेत. तो विषय क्लिष्ट व सर्वांस न समजण्यासारखा असल्यामुळें त्याची जास्त चर्चा येथें करीत नाहीं. दुसऱ्या वर्षाचें पंचांग तात्यांनीं आपल्या मालकीच्या झालेल्या श्रीधूतपापेश्वर छापखान्यांत छापिलें. यांत ज्योतिषशास्त्रदृष्टीनें अनेक सुधारणा असून शिवाय दर महिन्यांतील सण-वार-वऋतु यापरत्वें दिनचर्या वगैरेसंबंधीं बरीच उपयुक्त माहिती दिली आहे.

वैद्यकीच्या खालोखाल ज्योतिष हा तात्यांचा आवडीचा विषय होता. शिवाय त्या वेळीं पंचांग हा विषय विशेष चर्चेचा झाला होता. तात्या आजवर हयात असते तर त्यांनीं आपल्या पंचांगांत आजवर किती तरी सुधारणा घडवून आणल्या असत्या. इतर पंचांगकार पूर्वपरंपरेप्रमाणें पंचांगें काढीत, त्यांत सुधारणा करावी ही कल्पनाहि त्यांचे मनांत येत नसे. इतर पंचांगकार व तात्या यांचेमध्यें हा जसा महत्त्वाचा भेद दाखविला, त्याचप्रमाणें इतर धंदेवाईक आणि तात्या यांच्यामधेंहि एक मोठा फरक दिसतो. तो असा कीं धंदेवाइकानें आपल्या मालाच्या जाहिरातीसाठीं कॅलेंडर्स काढावीं हा बाजारचा शिरस्ताच पडला आहे. पण तात्यांनीं कॅलेंडर न काढतां पंचांग काढलें, यांत त्यांचें धोरण, उपयुक्तताबुद्धि व धर्मभावना असे गुण दिसून येतात.

सन १९०७ चे आरंभीं तात्या म्युनिसिपालिटींत व म्युनिसिपालिटींतून लोकल बोर्डात निवडून आले. सर्व कारभारांची आपल्याला माहिती पाहिजे असा त्यांचा कटाक्ष असे. राज-

कारण हा तात्यांचा विशेष आवडीचा विषय नव्हता. तरीपण ते सर्व ठळक वर्तमानपत्रें घेत असत व तीं ओझरतीं वाचीतहि असत. जगांत कोठें काय चाललें आहे इकडे त्यांचें साधारण लक्ष असे. त्यावेळीं दादाभाई नवरोजी ह्यांनीं राष्ट्रीय सभेचें तेज बरेंच वाढविलें होतें. लोकमान्य टिळकांचा राष्ट्रीय पक्ष नेमस्त पक्षाच्या छापेंतून बाहेर पडत होता. जिल्हानिहाय जिल्हासभा स्थापन करून त्या राष्ट्रीय सभेस जोडाव्या, असा विचार सुरू होत होता. त्या वेळीं कुलाबा जिल्ह्यांत पुणें म्हणून आपणांस म्हणविणाऱ्या पेणेस यासंबंधीं विचार करण्याकरितां जिल्ह्यांतील उत्साही मंडळींची बैठक झाली. त्या बैठकीस मी गेलों होतों. त्या वेळीं मी या जिल्ह्यांत अगदींच नवखा होतों. माझी जन्मभूमि वसई सोडून पनवेलीस वकिली करण्याकरितां आल्याला मला थोडेच दिवस झाले होते. पण सुदैवाची गोष्ट अशी कीं कांहींना कांहीं कारणांनीं मी येथें आल्यावर अल्पकाळांत येथील पुढाऱ्यांशीं माझा निकट प्रेमसंबंध जडला. त्या आधारावर पहिल्या कुलाबा जिल्हा सभेचें आधिवेशन पनवेलीस व्हावें, असें मी निमंत्रण दिलें. वस्तुतः असें निमंत्रण देण्या-पूर्वीं पनवेलची गांवकऱ्यांची सभा करून त्यांच्याकडून तसा अधिकार घ्यावयास पाहिजे होता. मी पनवेलचा निवडलेला प्रतिनिधी म्हणून नसून सार्वजनिक कामाच्या हौशीनें तेथें गेलों व फारच मोठी जबाबदारी घेऊन परत आलों. पण ही मीं घेतलेली जबाबदारी माझे गुरुबंधु तात्यासाहेब व माझे एक नवीन सन्माननीय स्नेही श्री. आत्मारामशेट आटवणे हे दोघे पार पाडतील, असा मला भरंवसा होता. व तो माझा भरंवसा चुकीचा ठरला नाहीं. तारीख २७।२८।२९ मार्च रोजीं पनवेल येथें कुलाबा जिल्हा सभेचें पहिलें अधिवेशन फारच थाटांत पार पडलें. त्यापूर्वीं हा तालुका राजकारणांत किंबहुना

कोणत्याहि सार्वजनिक कार्यांत फारच मागसलेला होता. पण गांवांत तट फूट वगैरे विशेष भानगडी नसल्यामुळें सर्वांच्या सलोख्यानें व साह्यानें कार्यक्रम उत्तम झाला. यांत आत्मारामशेट आणि पुराणिक हेच मुख्य पुरस्कर्ते असले तरी इतरही अनेकांचें अनेक प्रकारें साह्य झालें. सर्वांचा नामनिर्देश येथें करतां येत नाहीं. तथापि अंतोबादादा पटवर्धन व त्यांचे चिरंजीव रामचंद्र अनंत पटवर्धन, कृष्णाजी काशीनाथ ऊर्फ अप्पासाहेब पटवर्धन, विष्णुपंत गोविलकर व त्यांचे बंधु विनायकराव, बाबुराव लळीत वगैरे मंडळींनीं उत्साहपूर्वक विशेषच मेहनत घेतली.

चिंतामणराव वैद्य हे सभेचे नियोजित अध्यक्ष होते. शिवाय शिवरामपंत परांजपे, अण्णासाहेब विजापूरकर, पांगारकर, विनायकराव भावे वगैरे बरीच परजिल्ह्यांतील पुढारी मंडळी सभेस आली होती. कुलाबा जिल्ह्यांतील प्रत्येक गांवांतून पुढारी मंडळी आलीच होती. सभेचें अधिवेशन श्री. आत्माराम शेट यांच्या वडाळ्यावरील बागेंत झालें. या सुमाराच्या तात्यांच्या एका पत्रांत ते लिहितात कीं, "या कामीं गदाधर रावजी पडले आहेत. मला ही दगदग होणें नाहीं. कारखान्याचेंच काम होतांना पुरेवाट." तरी पण तात्यांचेकडून माणसांची व पैशाची मदत चांगली झाली. शेवटीं तात्यांच्या आवडत्या सोमवारीं तारीख २९ एप्रिल रोजीं सर्व पाहुणे मंडळीस तात्यांनीं श्रीखंड-पुरीची मेजवानी दिली.

कुलाबा जिल्हा सभेच्या ह्या पहिल्या अधिवेशनानें पनवेलींत सार्वजनिक कामाचा पायंडा पडला. व त्यानंतर दरसाल कांहींना कांहीं तरी सार्वजनिक चळवळ पनवेलींत होत राहिली. या कामीं पुढारीपण विष्णुतात्या पुराणिक व आत्माराम शेट आटवणे याच धनिक व परोपकारी गृहस्थांकडे असे. ह्या दोन्ही घराण्यांत पूर्वापारचा घरोबा होताच. त्यांत दोघांचीं मनें सारखींच उदार व सार्व-

जनिक कामांत तत्पर असल्यामुळें पनवेलीस हे दोघेहि विशेष भूषणभूत झाले. कुलाबा जिल्हासभेच्या अधिवेशनानंतर एक वर्षानें आत्माराम शेटजींच्याच बागेंत मागील प्रकरणांत लिहिल्याप्रमाणें वैद्यकसंमेलनाचा महोत्सव फार चांगल्या रीतीनें पार पडला.

त्यावेळीं चोहोंकडे सरकारी दडपशाही सुरू असतां शेतकरी वर्गाची सहानुभूति संपादण्याकरितां सरकारचे प्रयत्न तुरळक तुरळक होऊं लागले. त्यांत येथील लोकप्रिय मामलेदार रणदिवे व कलेक्टर काब्राजीसाहेब यांच्या प्रेरणेनें सन १९०८ सालीं तारीख १ ते १५ डिसेंबरपर्यंत पनवेल येथें शेतकी प्रदर्शन भरविण्यांत आलें. हें प्रदर्शनही शेटजींच्या जागेंत भरविलें गेलें. व या कामींहि सर्व पुढाकार तात्यासाहेब पुराणिक व आत्मारामशेट यांनींच घेतला होता. मी त्यांचा एक नेहमींचा हस्तक ठरलेलाच होतों.

तारीख ८ डिसेंबर सन १९०८ रोजीं शेतकी सभेचे उद्देश व कार्याची दिशा या विषयावर माझें व्याख्यान झालें. त्यांत ( १ ) जमीन ( २ ) मजुरी व ( ३ ) भांडवल हे तीन मुख्य मुद्दे होते. पहिल्या मुद्यासंबंधीं राबरहाट व खतें यांचा विचार, लागवडीस नसलेल्या जमिनी लागवडींत आणणें, कपास, भुइमूग, रबर यांची नवीन लागवड करणें, टाटाचे कालव्याचा उपयोग करणें इत्यादि विचार सारांशरूपानें मीं लोकांपुढें मांडले. दुसऱ्या मजुरी या मुद्यासंबंधीं जनावरें, माणसें व यंत्रें अशा तीन दृष्टींनीं जनावरांची अवलाद कशी सुधारावी, माणसांचे खुटव्यासाठीं निरनिराळ्या मोसमेचीं निरनिराळीं पिकें कशीं काढावीं वगैरे गोष्टी सांगितल्या. व तिसऱ्या भांडवल या विषयावर बोलतांना पतपेढ्यांची उपयुक्तता हा विषय समजावून दिला. या माझ्या भाषणाचे माहितगार वसईच्या किल्ल्यांतील सरकारी बोटॅनिकल गार्डनचे क्युरेटर पांडोबा जोशी हे होते.

ते माझे ग्रामस्थ व स्नेही असल्यामुळें त्यांचें म्हणणें मला पटलें. इतकेंच नव्हे तर तें तात्यांनाहि विशेष पटलें. या प्रदर्शनासंबंधीं लिहिलेल्या एका पत्रांत तात्या लिहितातः—

" श्रीधूतपापेश्वर मंदिर तयार झाल्यावर नेहमीं राहणारा बाजार, आठवड्याचा सोमवारचा बाजार आणि वर्षातून एखादे दिवसाचा ( शिवरात्र वगैरे ) बाजार असें होणार त्यांचा हा प्रारंभ होत आहे." शिवाय याच सुमारास रबराच्या लागवडीकरितां सरकार जमीन देत आहे ती घ्यावी काय ? असा तात्यांनीं श्रीसद्गुरूंना प्रश्न विचारला होता. पुढें ती जमीन घेतली नाहीं व रबराची लागवड केली नाहीं ही गोष्ट वेगळी.

सन १९०९ सालचे शेतकी प्रदर्शनाला गांवदेवीची जत्रा व गुरांचा बाजार यांची जोड मिळाली होती. ही जत्रा बाजार व प्रदर्शन आत्मारामशेटजींच्याच बागेंत भरलें होतें. हा बाजार व प्रदर्शन फारच मोठ्या प्रमाणावर झालें. सरकारचे कौन्सिलर सर जॉन म्यूर मॅकेंझी ह्या साहेबांचे हस्तें प्रदर्शनाचें अनावरण झालें. पण या समारंभाला एक मोठाच अपशकून झाला! समारंभाच्या आदल्या रात्रीं नाशिक येथील लोकप्रिय कलेक्टर मि. जॅक्सन यांचा नाटकगृहांत कोणीं खून केला ! त्यामुळें मूर मॅकेंझी साहेबांस येण्यास फार उशीर झाला व जे आले ते संतापानें भडकलेलेच आले! समारंभाचे आरंभींच ह्या गोष्टीची माहिती मिळाल्यामुळें आत्मारामशेट यांचे प्रास्ताविक भाषणांत झाल्या प्रकाराबद्दल अत्यंत खेद प्रदर्शित करण्यांत आला. रा. ब. नारायण त्रिंबक वैद्य यांच्या सूचनेवरून सर्वांनीं उभें राहून माना खालीं घालून दुःख व निषेधाचा ठरावहि केला. पण तेवढ्यानें सर जॉन म्यूर मॅकेंझीसाहेब यांचा राग शांत होण्यासारखा नव्हता. त्यांनीं आपल्या भाषणांत बरीच आग पाखडली ! तथापि

सर्व कार्यक्रम यथास्थित पार पडला. सर जॉन म्यूर मॅकेंझीसाहेब हे आपल्या भाषणानंतर सायंकाळीं शेजारच्या आत्मारामशेटच्या बागेंतील बंगल्यांत पानसुपारीलाहि गेले होते. या प्रदर्शनाचे वेळीं बाजाराला सुमारें दीड हजार गुरें आलीं होतीं. या एकंदर समारंभांत सभास्थानीं येऊन भाषणें करणें वगैरे पुढाकार तात्या कधींच घेत नसत. तरीपण एकंदर कार्यक्रमांत त्यांची अनेक तऱ्हेची पुष्कळच मदत असे.

याचप्रमाणें सन १९१० चे डिसेंबर महिन्याचे १० ते १७ तारखांस पनवेलची श्रीगांवदेवीची जत्रा, जनावरांचा बाजार, जनावरांचें प्रदर्शन, शेतकीसंबंधीं प्रदर्शन, व्याख्यानें व श्रीगांवदेवीची महापूजा व मिरवणूक वगैरे महोत्सव नामदार माधवराव चौबळ यांच्या हस्तें झाला. दुसरीहि बडी बडी मंडळी आली होती. शेतकी सभेचे सेक्रेटरी आत्माराम महादेव आटवणे व विष्णु कृष्ण पुराणिक या दोघांच्या सहीच्या निमंत्रणपत्रिका गांवोगांव गेल्या होत्या. या सालचें प्रदर्शनहि उत्तम होत आहे. अशीं तात्यांचीं पत्रें आहेत.

ह्यानंतर शेतकी सभेचा हा कार्यक्रम बंद पडला, यास कारणें अनेक झालीं. सरकारचें अगत्य कमी झालें, रावसाहेब रणदिवे हे मामलेदार बदलले व त्यांच्या जागीं जे नवे आले ते अगदींच भिन्न स्वभावाचे होते. शिवाय प्रदर्शनाचे वेळेचे सुमारास पनवेलची हवाहि साफ नसे. यामुळें हीं प्रदर्शनें बंद पडलीं, तीं पुन्हा भरलींच नाहींत. पण या एकंदर मुदतींत तात्यांनीं शेतजमिनी घेण्याचा फारच जोरानें उपक्रम सुरू केला. पनवेल तालुक्यांत कोणाची कोठचीहि जमीन विकायची असो, त्याला तात्या हें आपलें गिऱ्हाईक ठरलेलेंच आहे, अशीं कांहीं वर्षें गेलीं. पूर्वीं जमिनी घ्याव्या असें कृष्णशास्त्री म्हणत होते. व तात्यांस

ती गोष्ट पसंत नव्हती. कारण त्यावेळीं सर्व पैसा कारखान्यासाठींच पाहिजे होता. पण आतां तो काळ बदलला. तात्यांच्या या अभ्युदय काळांत तात्यांजवळ पुष्कळ पैसा खेळूं लागला. कुलाबा जिल्हा सभेपासून शेती हा विषय निरंतर चर्चेचा झाल्यामुळें व तन्निमित्तानें शेती खात्याचे सरकारी अंमलदार वरचेवर तात्यांकडे येत राहिल्यामुळें तात्यांना शेती वाढविण्याचा विलक्षण नाद लागला. तात्या याच सुमाराचे एका पत्रांत लिहितात "येथें हल्लीं कालवा, पाणी, जंमीन, ऊंस बागायत हे विषय रात्रंदिवस डोळ्यासमोर आहेत. गुळाचा कारखाना वगैरे उद्योग कसे साधावयाचे हा विचार सुरू आहे. सरकारी अधिकारी, शेतकी खात्याचे लोक वारंवार येत आहेत. जमिनी घेण्याचें कार्य सुरूच आहे."

या सुगींत लोकांनीं तात्यांच्या गळ्यांत ज्या जमिनी घातल्या त्या चांगल्यापेक्षां वाईटच अधिक होत्या. तात्या म्हणत, आम्हांला कसल्याहि जमिनी चालतील. उंचावरील वाईट जमिनींत बांध घालून तळीं करावीं व तें पाणी आजूबाजूस पुरवावें. माळ, वरकशी जमिनींत नाना प्रकारचीं झाडें व वनस्पती यांची लागवड करावी, असे त्यांचे बेत असत. त्यांचीं कोंकणांत जीं पत्रें जात त्यांत ते नाना प्रकारच्या लहान मोठ्या उपयुक्त झाडांचें मिळेल तितकें बियाणें मागवीत. त्यांना इमारती लांकडांचीं झाडें, खोके करण्याकरितां फळ्या पाडण्यासारखीं झाडें, यांचीहि गरज होती.

तात्यांचा आणखी उद्योग म्हणजे त्यांनीं सन १९११ सालीं नऊ हजारांचा मिठागर बेलापूर येथें घेतला. जो विषय पुढें येईल त्याची आपल्याला माहिती असावी, असें त्यांस वाटे. त्यांच्या धर्मपुरीच्या स्वायत्तेंत रहिवाशांच्या मिठापासून सर्व गरजा संस्थेंतून पुरवितां आल्या पाहिजेत, असे त्यांचे विलक्षण विचार असत.. गुळाचा कार-

खाना, साखरेचा कारखाना, कांचेचा कारखाना, कापड विणण्याचा कारखाना, असे अठरा कारखाने श्रीधूतपापेश्वर संस्थेनें चालवावे अशी त्यांची महत्त्वाकांक्षा होती. व त्याप्रमाणें त्यांचे प्रयत्नहि सुरू होते. मुंबईच्या नामजोशी यांच्या लुगड्यांचे कारखान्यास त्यांचेंच भांडवल होतें. व तो कारखाना पनवेलीस येऊं घातला होता. बडोद्याचे कोणी एक चिपळूणकर शास्त्री हे कांच तयार करण्याचे प्रयोग करीत होते. व त्यांस आश्रय देण्याचा तात्यांचा विचार होता. साखरेच्या धंद्यांत त्यांचे कुटुंबाचे बंधु शींवचे नवरे हे तज्ज्ञच होते. याप्रमाणें त्यांचे निरनिराळे सल्लागार व मदतगार होते. त्याप्रमाणें तात्यांनीं पनवेलीस एक मोटारसर्व्हिसही काढली होती. ती येथील पहिली मोटार कंपनी होय.

या त्यांच्या विविध उद्योग आणि चळवळींच्या कल्पना त्यांच्या मनांत अखेर पांच सहा वर्षें एकसारख्या फारच घोळत असत. त्या जसजशा त्यांच्या मनांत येत तसतशा ते आपल्या छापखान्यांत त्या छापीत व त्याच्या प्रति त्यांच्या निवडक इष्टमित्रांकडे विचारविनिमयाकरितां पाठवीत. असें हें त्यांचें मनोराज्य दिवसानुदिवस वाढत चाललें. व त्याचबरोबर तें मूर्त रूपांत आणण्याची त्यांची उतावळीहि फार बळावली. या त्यांच्या मनोराज्यांत सर्वाधिष्ठाता श्रीशिवगुरु हे केंद्रस्थानीं आधिष्ठित होते. अशा त्यांच्या लोकविलक्षण अशा मनोराज्याचें स्थूल स्वरूप पुढील प्रकरणांत देत आहें.

**सामर्थ्य आहे चळवळीचें । जो जो करील त्याचें ।**
**परतु तेथें भगवंतांचें । अधिष्ठान पाहिजे ॥ समर्थ रामदास ॥**





# प्रकरण २८ वें.

## धर्मपुरीचें मनोराज्य
### अथवा
## आज मनांत वारंवार येत असलेले दुःसाध्य विचार

येथून वाढिला धर्मु। रमाधर्म समागमें ॥
संतोष मांडला मोठा। आनंदवनभुवनीं ॥

रामदास.

तात्यांनीं मथळयावरील नांवाचें एक मोठें पत्रक छापलें. त्या पत्रकावर "कृपा करून सवडीप्रमाणें वाचून दुरुस्त करून व आणखी काय हवें असेल तो मजकूर घालून हे सर्व कागद बुक पोष्टानें परत मजकडे पाठवावे." याप्रमाणें छापील सूचना आहे. तथापि हें पत्रक खाजगी स्वरूपाचें होतें; जाहीर रीतीनें प्रसिद्ध केलेलें नाहीं व करण्याचें कारणहि नव्हतें.

आपणांस अशक्यप्राय वाटणारें हें मनोराज्य तात्या हयात असते तर त्यांनीं बहुतांशीं मूर्त रूपास आणलें असतें, यांत शंकाच नाहीं. तेव्हां जें आयुष्य त्यांच्या स्वाधीन नव्हतें त्या आयुष्याच्या परस्वाधीन-

तेनें जरी त्यांचें हें मनोराज्य छापखान्याचे प्रुफांतच राहिलें, तरी त्यांच्या अंतरंगाचें रहस्य यांत सांठविलेलें आहे. तेंच त्यांचें अव्यक्त चरित्र होय. तात्या ही व्यक्ति गेली तरी त्यांची ध्येयरूप संस्था चिरंजीवी आहे. तात्यांचें मनोराज्य ही त्या संस्थेच्या वाढीची एक मूस आहे. या दृष्टीनेंहि त्या मनोराज्याची रूपरेषा या चरित्रग्रंथांत देणें योग्य दिसतें. शिवाय ह्या मनोराज्याचे दर्शनांत तात्यांचे एषणांचें धर्म हें अनन्य साधारण अधिष्ठान स्पष्ट व उघड होत आहे. तात्यांच्या या अद्भुत मनोराज्याचीं मुख्य खातीं अठ्ठावन असून एकंदर पोट-खातीं जवळ जवळ एक हजार आहेत. त्यांतील अगदीं ठळक खालीं देत आहें.

[ १ ] **पूज्य श्री वैदिकधर्म व देवमंदिर व्यवस्था–श्रीधूतपापेश्वर मंदिरः**–त्यांतील पूजा, अर्चा, अभिषेक, ब्राह्मणभोजन, गोशाळा, महोत्सव, मिरवणुकी. **वैदिक धर्मबुद्धि**–वेदधर्मशास्त्रशिक्षण, विद्वानांचा परामर्श, पुराण, कीर्तन, चर्चा, गायन, भजन, स्तोत्रपाठ, धर्मनीतिव्यवस्था, **उपासकांची योगक्षेमाची तरतूद**, योगाभ्यासाची व्यवस्था, फुलबाग, उपकरणीं चांदी–तांबे–पितळेचीं, अन्नवस्त्र, फळें यांचीं दुकानें, शिवस्वाबद्दल व्यवस्था, देवाचें भांडागार, सेवेकऱ्यांचे हक्क, देणग्या, नेमणुका व कर्तव्यें, **देवालयाची नित्य व्यवस्था,** हजेरी, कचेरी, दुरुस्ती, देखरेख, व हिशेब, देवालयासंबंधीं रोगी-पंगू यांची विशेष व्यवस्था, निर्बंध व निषेध व्यवस्था.

[ २ ] श्रीधूतपापेश्वर मंदिराशिवाय इतर देवालयें व देव यांची व्यवस्था वरीलप्रमाणें

[ ३ ] जैन धर्मी मंडळीकरितां विशेष सोय. वरीलप्रमाणें.

[ ४ ] इतर धर्मी लोकांकरितां. वरीलप्रमाणें.

[ ५ ] **संस्थेचें प्रतिनिधिगृहः**—सल्लागार मंडळें. व्यवस्थापक मंडळें. कार्यकारी मंडळें. सूक्ष्मदृष्टि खातें. सर्व खात्यांस चालना व हुकूम. गुणग्राहकता. बढत्या. देणग्या. नियंत्रणें. निर्बंध.

[ ६ ] श्रीधूतपापेश्वर संस्थेसंबंधीं **नियम** व **निर्बंध** यांचीं **धोरणें**. हक्कदारांच्या हक्कांच्या शर्ती, संस्थेंतील निरनिराळ्या भागांत प्रवेशा-संबंधीं निर्बंध. प्रवेश फी. राजनिष्ठा. सेवकांची नीतिमत्ता. सेवकां-कडून कालाचा सद्व्यय. आचारमर्यादा. सुधारणेच्या सूचना व त्यांची अंमलबजावणी. सेवकांचे व्यक्तिपरत्वें जादा अधिकार. अपराधशासन. प्रसिद्धीखातें. तपासणीखातें.

[ ७ ] **फडणीस कचेरी** व वरिष्ठ हिशेब तपासणी खातें. पैक्याचा, कच्च्या व पक्क्या मालाचा, यांत्रिक मालाचा हिशेब. दप्तरची व्यवस्था. नमुने. सेवापुस्तकें, खात्यानिहाय साप्ताहिक अहवाल.

[ ८ ] **औषधि उद्यानः**–निरनिराळ्या औषधींचा शोध, लागवड व जोपासना. त्यांची वर्गवारी व त्यांवर नांवाचे फलक. उद्यानाचा वनस्पतींच्या वर्गवारीप्रमाणें नकाशा. वनस्पतींच्या गुणदोषवर्णनांच्या सचित्र याद्या. रोगी व विद्यार्थि यांचे उद्यानासंबंधीं नियम व निर्बंध. वनस्पतींची विक्री. प्रसिद्धी खातें.

[ ९ ] **पदार्थ व प्राणिसंग्रहालयः**–कोणतेही खनिज, प्राणिज, अन्नमय, वनौषधि, कृत्रिम, रासायनिक, शारीरिक, पदार्थ–व्यवस्थित रीतीनें वर्गवारीनें नांवनिशीसुद्धां मांडणें. अनेक जिवंत प्राणी व मेलेल्या प्राण्यांचे महत्त्वाचे अवशेष व त्यांचे कारागिरीनें केलेले पदार्थ, सचित्र, नंबरवार यादी व नकाशासह.

[ १० ] **वाचनालयः**—आरोग्यमंदिर मुख्य वाचनालय. विद्या-खातें वाचनालय. सेवकवर्ग वाचनालय. प्रवेश रवानगी गृह.

[ ११ ] **मुख्य एजंट यांची कचेरीः**—जुन्या नव्या औषधांची तयारी. पुरवठा. एजंट व रोगी यांच्याशीं पत्रव्यवहार. औषधासंबंधीं हिशोब. यादी. प्रसिद्धीकरण.

[ १२ ] **आरोग्यमंदिर खातें**:—आरोग्य **मंदिर प्रवेश**. तपासणी. निवड. शर्ती. सोबत रोग्यांची राहण्याची वर्गवारीनें निरनिराळ्या दर्जांची व प्रकारची व्यवस्था. सामानाची व्यवस्था. **पथ्यपाण्याची व्यवस्था**—योग्य सेवकांची निवड. **आरोग्याप्रीत्यर्थ उपचार**—वैद्य, डॉक्टर, नर्सेस. शस्त्रक्रियागार. ज्योतिष, धर्मशास्त्र, पुराणें, कर्मविपाक, यांत सांगितलेल्या पापशांत्यर्थ मंत्र-जप-दानें इत्यादि तजविजी. **व्यायाम व करमणूक**—सहल करणें, संगीत, भक्तिपर ग्रंथवाचन वगैरे. **निर्बंधयुक्त व्यवस्था**. संसर्गदोष, लांचलुचपत, अपथ्यसेवन, अयोग्य वर्तन इ०. स्त्रिया व विशेष प्रकारचे रोगी यांची स्वतंत्र व्यवस्था. रोग्यांच्या तक्रारी, त्यांच्या चीजवस्तूंचें रक्षण. रिपोर्ट. अनुभव, जपणूक, रजिस्टर आणि हिशेब.

[ १३ ] **टेलिफोन व टपालखातें.**

[ १४ ] **स्थानिक औषधविक्रीखातें.**

[ १५ ] **चालकांची कचेरी**, देखरेख—निरनिराळ्या खात्यांच्या तजविजी लावणें, संरक्षण, मालाची आयात-निर्गत.

[ १६ ] **विद्याखातें**:—आयुर्वेद शाळाखातें. उत्तम गुरुजींच्या नेमणुका. विद्यार्थ्यांची निवड. त्यांची राहण्याची, भोजनाची सोय. खासगी वर्तनावर देखरेख, शिक्षणक्रम, परीक्षा पदव्या, शिष्यवृत्ति, निर्बंध.

[ १७ ] **वैद्यशास्त्र**:—शिक्षणोपयोगी नियम.

[ १८ ] **आयुर्वेद शाळाः**—शिक्षणक्रम व विविध विषय.

[ १९ ] **आंग्लवैद्य शास्त्राशिक्षणः**–इंद्रिय विज्ञान. शस्त्रवैद्यक. प्रसूति. न्यायवैद्यक. रसायनशास्त्र. वनस्पतिशास्त्र. व्यापारी वैद्यक. अनुभविक वैद्यक.

[ २० ] वैद्यशास्त्राचे **सामान्य शिक्षणाचे वर्गः**—ज्यांस शिक्षणक्रम पुरा करितां येत नाहीं अशा वृद्धांकरितां व्यवहारवैद्यकाचें सामान्य शिक्षण.

[ २१ ] ज्योतिषशास्त्रशाळा. वेधशाळा. ज्योतिर्गणित नवीन ग्रंथ तयार करणें. फलज्योतिष. रोगी लोकांची ज्योतिषशास्त्राधारें चिकित्सा व रोगपरिहाराचे इलाज.

[ २२ ] अनेक विद्या व उद्योग शिक्षणशाळा.

[ २३ ] प्राथमिक शिक्षण.

[ २४ ] व्यावहारिक शिक्षण.

[ २५ ] कृषिकर्म विद्या.

[ २६ ] शिल्पविद्या.

[ २७ ] विद्युत्शास्त्रशाळा.

[ २८ ] यांत्रिक विद्या.

[ २९ ] मुद्रणालय शिक्षण.

[ ३० ] व्यापारी वर्ग.

[ ३१ ] व्यायाम शाळा.

[ ३२ ] **आर्यौषधि कारखानाः**–पूर्व तयारी, इमारती, यंत्रसामुग्री, कच्चा माल, मागणीचा अंदाज, औषधींची योग्य वेळीं खरेदी, औषधें तयार करणें, औषधांची तपासणी व संरक्षण, पथ्य पदार्थ तयार करणें व करविणें, औषधांची रवानगी.

[ ३३ ] **कोठीखातें.**

[ ३४ ] कारखान्यानजीक पण बाहेरचीं निराळीं खातीं, डबे, पेट्या, यंत्रें इत्यादि तयार व दुरुस्त करणें.

[ ३५ ] **औषधविक्रीची व्यवस्थाः**-एजंट व ग्राहक यांचेसंबंधानें आवक जावक पत्रांची नोंद, पार्सल व मनिऑर्डर यांची नोंद, हिशोबतपासणी, साप्ताहिक, मासिक, वार्षिक हिशोब.

[ ३६ ] **प्रसिद्धीची व्यवस्थाः**-श्रीधूतपापेश्वर या नांवाचें वतमानपत्र, मासिक, संस्थेच्या सर्व शाखांचे रिपोर्ट, विद्वानांचे लेख, नियतकालिकें, पंचांगें, डायऱ्या यांत जाहिराती. हॅण्डबिलें. गोष्टींचीं पुस्तकें. व्याख्यानें, पत्रकें व पुस्तकें याद्वारा.

[ ३७ ] भाषांतर खातें:—इंग्रजी, हिंदी, बंगाली, उर्दू, कानडी, गुजराथी व इतर भाषांत.

[ ३८ ] प्रसिद्धिपत्रकांचे प्रकार. औषधें घेण्याची रीति. औषधांची किंमतवार याद्दी. निरनिराळ्या सांर्थीचे रोगांवरील पत्रकें. जुने रोग. आरोग्यरक्षण.

[ ३९ ] वैद्यशास्त्रासंबंधीं पुस्तकें. आरोग्यशास्त्राचीं मूलतत्त्वें. रोगी व वैद्य. अनुपानप्रकरण. पथ्यापथ्य विचार. औषधयोजना. सर्वसाधारण माहिती-भागशः अगर कोशरूपानें. शास्त्रीय शब्दार्थकोश.

[ ४० ] श्रीधूतपापेश्वर **मुद्रणालय खातें**:-फाउंडरी व बुकबायंडिंग सुद्धां.

[ ४१ ] **गोशाळा खातें**:—दुभतीं व दुभतीं नाहींत अशीं जनावरें. अन्य वन्य पशु. दुभत्याची व्यवस्था. मंदिराकडे व सॅनिटेरिअमकडे. शेण, मूत वगैरे शेतीकडे.

[ ४२ ] **शेतकी**:—बागाईत खातें. भूमिसंपादन. रचना व बांदिस्ती. पाण्याचे सांठे. आर्टिशियन विहीरी. पंप. मोटस्थळें वगैरे.

खतांची व्यवस्था. कारखान्यांतील केरकचरा, सांडपाणी, शेण–मूत वगैरे. रोगनाश. नवीन लागवडीचे प्रयत्न. औषधी उपयोगाकरितां आवळे, लिंबें इ. पथ्याचे पदार्थ. इतर उपयुक्त झाडें. व्यापारी जिन्नस. रेशमी किडे. मध. आउतें वगैरे करण्याचे कारखाने, जनावरांचे गोठे, धान्याचीं कोठारें, शेती खात्याकडून इतर खात्यांस पुरवठा. मजूर व गाड्या पुरवणें, शेतकरी लोकांत ज्ञानप्रसार, नवीन प्रयोग व अनुभव, नकाशे व हिशोब.

[ ४३ ] कोकणांत होणाऱ्या बागाईत, खरीप, रब्बी, व खारी, या जमिनींतील निरनिराळ्या भातांचे व द्विदल धान्यांचेसंबंधानें व्यवस्था.

[ ४४ ] अरण्य व पशु संरक्षण खातें–खतें गोळा करणें. नवीन लागवड, कापणी व रक्षण, सीमारक्षण.

[ ४५ ] अनाथ रक्षण खातें. अनाथ माणसें व जनावरें यांचें रक्षण.

[ ४६ ] शिल्प इमारत व पाण्याचीं कामें.

[ ४७ ] मेकॅनिकल एंजिनीयर खातें, मोठीं पात्रें व यंत्रें तयार करणें व दुरुस्त करणें.

[ ४८ ] विद्युच्छक्ति खातें.

[ ४९ ] संस्थेच्या सर्व ठिकाणीं पिण्याचे पाण्याचा पुरवठा, रस्ते व प्रकाश खातें.

[ ५० ] **श्रीधूतपापेश्वर द्रव्यभांडार बँक.**

[ ५१ ] बँकेचें व्यापार खातें.

[ ५२ ] व्यापारवृद्धि खातें, संमेलनें, जत्रा, प्रदर्शनें, पोट धंदेवाईकांस उत्तेजन.

[ ५३ ] प्रवेश व रवानगीगृह, येणारांचें स्वागत व रवानगी.

[ ५४ ] व्यवहारकार्य शिक्षणगृह, सेवक होऊं पहाणारांस ती ती सेवावृत्ति शिकविणें.

[ ५५ ] धर्मपुरी **वसाहत खातें**. वसाहतीचे विभाग, नकाशे, सडका, विहिरी, दिवे, बाजार, वाहनें, स्वच्छता, संडास, ड्रेनेज वगैरे.

[ ५६ ] श्रीधूतपापेश्वरसेवकांची व्यवस्था. शिक्षण, परीक्षा, वेतन, बढती, बैठा पगार, शिस्त, सेवकांचें शिक्षण, सेवकांच्या सभा, वाचनाची सोय वगैरे.

[ ५७ ] न्याय खातें—संस्थेंतील व्यक्तींचे विरुद्ध तक्रारी व त्याचा प्रतिनिधींकडून निर्णय.

[ ५८ ] निर्बंध संरक्षण खातें. सन्मानार्थ व बंदोबस्ताकरितां शिपाई. अग्नीपासून रक्षणाची तरतूद वगैरे.

शुभं भवतु.

---

रिकाम्या कोंदणाप्रमाणें वरीळ मनोराज्य कोणाला व्यर्थ वाटेल. तर कोणाला त्यांत पुष्कळच गोष्टी सूचक व अनुकरणीय वाटतील. जीं कार्यकर्तीं माणसें आहेत, त्यांस मनोराज्याचें कौतुक वाटेल. जे रिकामे टीकाखोरच आहेत ते याचा कदाचित् उपहासहि करतील. हें मनोराज्य दुःसाध्य आहे ह्याची जाणीव तात्यांना होतीच. ती त्यांनीं वर मथळ्यांत स्पष्ट केलीच आहे. पण दुःसाध्य व असाध्य यांत जें अंतर आहे, त्यापेक्षां सुसाध्य व दुःसाध्य यांत अंतर कमी आहे व तें अंतर तोडण्याचा तात्यांनीं दीर्घ प्रयत्न चालविला होता. ह्या मनोराज्यांतील कित्येक खात्यांचे पाये तात्यांनीं घातलेहि होते. इमारतींचे प्लॅन झाले होते. तसें पाहतां यांत अलौकिक असें कांहींच नाहीं. यास्तव हें मनोराज्य प्रत्येक होतकरू तरुणास स्फूर्तिदायक व उत्साहवर्धक होईल अशी आशा आहे.

वर तात्यांच्या मनोराज्याची स्थूल रूपरेषा मात्र दिली आहे. त्यावरून त्यांच्या मनाचा व्याप लक्षांत येईल. सरकारी अनेक खात्यांच्या यादीचा हा एक संक्षिप्त उतारा आहे असें कोणास भासेल. परंतु तात्यांच्या मनोराज्यांत हीं खातीं श्रीधूतपापेश्वर संस्थेंत प्रत्यक्ष अमलांत आलेलीं त्यांस दिसत होतीं. आणि शिवाय तात्यांचें मनोराज्य धर्मभावनेवर अधिष्ठित होतें. सरकारी खात्यांतील राजनीतीची योजना व परोपकाराची आणि ईशसेवेची धर्मभावना यांत महदंतर आहे.

**या कारणें सावधान असावें। जितुकें होईल तितुकें करावें॥**
**भगवत्कीर्तीनें भरावें। भूमंडळ ॥ १ ॥** रामदास.





# प्रकरण २९ वें.

## आधि-व्याधि

संसार म्हणिजे महापूर। माजीं जळचरें अपार।
डंखूं धांवती विखार। काळसर्प ॥

दा. बो. ३।१०।१

मागील प्रकरणांत तात्यांच्या मनोराज्याचें त्रोटक वर्णन केलें आहे. तें कौतुकास्पद आहेच आहे. पण त्यांतहि तें मनोराज्य करीत असतां ते सतत कोणत्या अत्यंत प्रतिकूल परिस्थितींत होते, हें लक्षांत घेतलें असतां आपलें आश्चर्य द्विगुणितच होतें.

तात्यांच्या महत्त्वाकांक्षेला सन १८९६ सालीं वाचा फुटली. तेव्हांपासून तों अखेरपर्यंत बहुतेक दरसाल प्लेगनें त्रस्त करून सोडावें हें एक घोर संकट दिवसा मागून येणाऱ्या रात्री-प्रमाणें एकसारखें येतच होतें! या सामान्य सांथीच्या रोगा-

शिवाय तात्या, त्यांचें कुटुंब व त्यांचीं मुलें या सर्वांनाच दुखण्याबहाण्यांनीं एकसारखें सतावून सोडलें होतें. तात्यांना दमा, खोकला, वृद्धि, रक्तविकार, मूळव्याध, मधुमेह, निद्रानाश, वातविकार व ताप अशा अनेक व्याधींनीं अत्यंत त्रस्त केलें होतें! तात्यांचें पहिलें कुटुंब अत्यंत सुस्वभावी व कष्टाळू असें होतें हें खरें. पण अति अशक्तपणा, दमा, खोकला, कान फुटलेले, डोळ्यांत वडस अशी ती एक गरीब बिचारी विकृत प्रकृति होती! त्यांतहि त्यांचीं अपुरे दिवसांचीं बाळंतपणें, अपत्यहानि, हे तापदायक प्रकार होतेच! एकदां तर त्यांस जुळीं मुलें झालीं! तीं एक महिनाभर होतीं! आणि अखेर ज्या बाळंतपणांत त्यांचा अंत झाला, त्या खेपेस त्यांना जी मुलगी होऊन गेली, तिला जन्मतःच पुढचे दोन दांत होते!

यानंतर तात्यांचें दुसरें लग्न झालें. पण या दुसऱ्याहि कुटुंबाची प्रकृति बरेच दिवस आजारी होती. त्याचप्रमाणें त्यांच्या मुलांचीहि प्रकृति ताप, खोकला, नेत्रविकार, रक्तविकार यांनीं सदा नादुरुस्त असे. असें त्यांच्या पत्रव्यवहारावरून दिसून येतें. तात्यांचे द्वितीय कुटुंबाच्या मातोश्री त्यांच्या अगदीं बालपणीं, त्या अंगावर पीत असतां, अन्नांत विषार होऊन एकाएकीं मरण पावल्या! ती विषबाधा त्यांसही थोडी फार नडली. तेच सूक्ष्म संस्कार त्यांस व त्यांच्या मुलांस बाधक झाले असण्याचा बराच संभव आहे. तें कांहीं असो. अत्यंत आश्चर्याची गोष्ट हीच कीं तात्या इतके आधिव्याधिग्रस्त असतां कारखान्याचा कारभार उत्साहानें अखंड चालवीतच होते. तसेंच त्याच बरोबर पहिल्या बायकोच्या राहिलेल्या पिंपळाच्या लक्ष प्रदक्षिणा, सूर्यंयंत्रास प्रदक्षिणा, नमस्कार, अध्यात्मरामायण, शिवकवच इ. पठण, लघुरुद्र महारुद्र यांचीं वरचेवर होणारीं अनुष्ठानें, श्रीवासुदेवानंद सरस्वति यांनीं

सन १९१० सालीं संकटनिरसनार्थ सांगितलेलें नरसोबाचे वाडीस श्री दत्तपादुकांवर रोज एक याप्रमाणें अकरा दिवस महारुद्रानुष्ठान, नाशिक त्र्यंबकेश्वरच्या यात्रा, असे किती तरी प्रकारचे व्याप एकसारखे सुरूच होते. त्यांत कपिलाषष्ठी, अर्धोदय अशा अनेक पर्वणींच्या वेळीं दानधर्म होतच असे. शिवाय सन १९०० नंतर दरसाल धोपेश्वर, आर्यादुर्गा, आडिवरें ही एक यात्रा बहुधा माघमासीं होतच असे. तात्यांचे धंद्या-कडील व्यवधानांत हंमेश व्यत्यय आणणारे हे सततचे अगदीं ठळक असे सामान्य प्रकार झाले. यांतहि तंटे, भांडणें, बेबनाव, बेदिली, कोर्ट दरबार, आणि मनुष्यहानि असे आणखी विशेष तापदायक प्रकार अनेक घडले !

तात्यांचा व त्यांच्या बंधूंचा स्वभाव फारसा मिळता नव्हता. त्यांतहि श्रीधूतपापेश्वर कारखाना अविभाज्य व एकसूत्री रहावा असा त्यांचा प्रथमपासून विशेष कटाक्ष असल्यामुळें सन १९०७ सालीं तात्यांनीं आपल्या तिघां बंधूंस त्यांच्या एकत्र कुटुंबांतील हक्का-बद्दल प्रत्येकीं दहा दहा हजार रुपये देऊन त्यांच्या फारखती लिहून घेतल्या. शिवाय त्यांस आर्यौषधि कारखान्यांत कामगार म्हणून वेतन घेऊन निरनिराळीं श्रेष्ठ दर्जाचीं कामें करावीं असें ठरविलें. त्याप्रमाणें तारीख १७ नवंबर सन १९०७ रोजीं त्यांचा करार करून घेतला. या करारान्वयें गदाधररावजी हे मुख्य एजंट व चालक झाले. बापुरावांकडे मुंबईचा दवाखाना व दुकानचा व्यवहार गेला व रामभाऊंकडे हिशेब व स्थानिक दवाखाना व घरप्रपंच हीं कामें आलीं. त्यांना पगारहि ठळक असून त्याशिवाय त्यांना ते कराराप्रमाणें सेवा करीत आहेत तोंपर्यंत वेगवेगळ्या खात्यांतील विक्रीवर अल्प प्रमाणांत एक ते अडीच टक्के-पर्यंत कमिशन मिळावें असें ठरविलें. तसेंच सन १९०८ सालीं

तात्यांनीं आपल्या चुलत बंधूकडून वांटणीपत्र करून घेऊन आर्यौषधि कारखान्याचे ते स्वतंत्र मालक बनले. :ही सर्व खटपट एकसूत्री-पणानें आपल्याला वाटेल ती व्यवस्था करितां यावी याचसाठीं होती. त्यांत दुसरा स्वार्थ किंवा वितुष्टपणा मुळींच नव्हता.

तात्यांनीं कारखान्याचा उत्सर्ग करण्याचें ठरविलें, त्यावेळीं हा मुलांना कांहींच ठेवीत नाहीं, म्हणून वडिलांना स्वाभाविकच राग आला होता. त्यावेळीं मी भावांची योग्य ती तरतूद करीन, असें तात्यांनीं वडिलांस आश्वासन दिलें होतें. तें आश्वासन तात्यांनीं फारच उदारपणानें पुरें केलें. व भावांचें कांहीं एक नुकसान न करितां त्यांच्या चरितार्थाची पुढीलही व्यवस्था लावली. असें झालें तरी ही वांटणी भावांत थोडें तरी अस-माधान उत्पन्न करण्यास कारण झाली. व त्यानंतर लवकरच एकेक बंधु वेगवेगळे राहण्याचे उद्योगास लागले. त्यांत रामभाऊंचा विचार पनवेलींत न राहतां दादर, चिंचपुकली इकडे कोठें दवाखाना काढून राहावें असा होता. हा बेबनाव कधीं कधीं बरेंच उग्र व कटु स्वरूपहि धारण करी. उदाहरणार्थ, सन १९०९ सालीं एका कच्च्या इमारतीची मुहूर्त मेढ राहत्या घराशेजारींच पुरावी असें तात्या म्हणत असतां त्यांस त्यांच्या बंधूंकडून जोराचा निषेध झाला. या प्रकाराचा परि-णाम तात्यांच्या मनावर फारच झाला. ते तारीख १५ जून १९०९ चे पत्रांत लिहितात "पनवेलींतून लवकर बाहेर जावें अशाकरितां ही ईश्वरी सूचना नसेल ना ?"

तात्यांच्या घरचा हा बेबनाव जसा कटु झाला होता, तसाच तात्यांचा पनवेलच्या कांहीं ब्राह्मण पुढाऱ्यांशीं संबंधहि फार कटु होत चालला होता. पनवेलीस बापटांचें घराणें सर्वांत जुनें व प्रमुख होतें हें वरतीं आलेंच आहे. या बापट घराण्याला पुढें पडता

काळ आला. त्यांच्या शेजारीं कै. कृष्णाजी काशिनाथ उर्फ अप्पासाहेब पटवर्धन हे एक प्रमुख वकील व पुढारी राहात असत. अप्पासाहेब पटवर्धन हे गांवांत बरेच वजनदार व फारच लोकप्रिय होते. त्यांचा स्वभाव मनमिळाऊ व दिलदार असून त्यांना माणसांचें फार अगत्य असे. पक्षकार, स्नेही, आप्त, इष्ट अशा मंडळींची त्यांचे घरीं सदा गर्दी असायची. कोणतेंही कार्य दहा मंडळीस बरोबर घेऊन करावें, अशी त्यांना हौस असे. अप्पासाहेबां-सारखे इभ्रतदार व लोकप्रिय वकील आतां गांवोगांव आढळणें कठीण. खावें, प्यावें, मजा करावी, अशी त्यांचे घरीं सदा चंगळ असे. तसेंच ते धर्मनिष्ठ होते. त्यांचें अंमलदार, व्यवसायबंधु, व्यापारी, पक्षकार व ग्रामस्थ ह्या सर्वांवर वजन असे. ते मुन्सफ मामलेदार यांचेवर जशी छाप टाकीत, तसे ते तलाठी, कारकून, शाळामास्तर यांचेंबरोबर रात्रींच्या रात्री सोंगट्या वगैरे खेळण्यांत घालवीत. त्यांचें मजवर अकारण फार प्रेम असे. मी सन १९०५ चे जूनमध्यें येथें नवीनच वकील झालों. अप्पासाहेबांनीं उन्हाळ्याचे सुटीनंतर कोर्ट उघड-ण्याचें पहिल्याच दिवशीं त्यांच्या स्वतःच्या एका दाव्यांत मला आपले वतीनें एक वकील केलें. हा माझा पनवेलींतील वकीलीचा शकूनच होय. कर्मधर्मसंयोगानें हा दावा पुढें पनवेलच्या ब्राह्मण मंड-ळींत बेबनाव उत्पन्न करण्यास अंशतः कारण झाला. बापट व पटवर्धन यांच्या घरांच्या दरम्यानच्या जागेबद्दल हा दावा होता. बापटांना पूर्वी-पासून पुराणिकांचा आधार होता. कै. कृष्णशास्त्री पुराणिक यांच्या यज-मान घराण्यांपैकीं बापटांचें जुनें प्रमुख घराणें होतें. ह्या जुन्या घरा-ण्याचा तात्यांसहि अभिमान वाटे. मी पुराणिकांचा स्नेही व उलट अप्पासाहेबांनींहि मला वात्सल्यप्रेमानें आपलेकडे ओढलें होतें. बहुतेक वकील व ब्राह्मणांतील घरंदाज पुढारी मंडळी अप्पासाहेबांच्याच

बाजूची होती. उलटपक्षीं बापट यांचे बाजूस नांव घेण्यासारखे असे पुराणिक हे एकटेच प्रमुख असत. तात्यासाहेब यांनीं बापटांना आणखी श्रीसद्गुरु समर्थ काका पुराणिक यांची जोड करून दिली. बापट यांचे प्रत्येक कामाचा तात्यांनीं अभिमान बाळगून ते त्यासंबंधीं श्रीसद्गुरूंना हरघडीं विचारूं लागले. श्रींकडून बापटांना यश येईल असा जबाब आला.

तात्यासाहेबांचा हा उपक्रम गुप्त राहिला नाहीं. या बापट विरुद्ध पटवर्धन प्रकरणांत सद्गुरूंचीं भविष्यें अखेर कशीं खरीं ठरत गेलीं, त्याबद्दलचें एक पत्रकच तात्यांनीं आपल्या छापखान्यांत छापून काढलें ! याचा परिणाम असा झाला कीं, पनवेलच्या कित्येक शिष्ट मंडळींच्या ठिकाणीं तात्यांचेबरोबर त्यांचे श्रीसद्गुरु काका पुराणिक यांचेबद्दलहि अनादर उत्पन्न झाला !

यानंतर पनवेलच्या श्रीबल्लाळेश्वर रामजी या देवळाचा जीर्णोद्धार करण्याचा प्रश्न निघाला. देवळें आपलीं असें बापट म्हणत. पण देवळांचा जीर्णोद्धार करण्याचें सामर्थ्य त्यांस नव्हतें. तेव्हां पनवेलच्या ब्रह्मवंदांची सभा होऊन त्यांत निवडलेल्या कमेटीनें जीर्णोद्धाराचें कार्य करावें असें ठरलें. व देवस्थानांची वहिवाट पनवेलच्या ब्रह्मवृंदांनीं नेमलेल्या पंचांनीं पहावी असेंहि ठरलें. यांतहि बापट विरुद्ध पटवर्धन व त्यांचे स्नेही ही तेढ जास्तच वाढीस लागली. बापट आपल्या ताब्यांतील भांडीं वगैरे मिळकत पंचांचे ताब्यांत देत ना. याहि भांडणांत तात्या जरी गांवकऱ्यांच्या पंचांचे विरुद्ध नसले, तरी त्यांचा ओढा बापटांकडेच होता. या बाबतींत तात्यांचें व माझें नेहमीं बोलणें होई. माझें म्हणणें तात्यांनीं या गांवकीच्या लढ्यांत पडूं नये. एक तर "जनीं निंद्य तें सर्व सोडोनि द्यावें । जनीं वंद्य तें सर्व भावें

करावें ॥ " हा व्यवहारांतील शिष्टाचार लक्षांत घेतां गांवांतील चार शिष्टमंडळींच्या विरुद्ध मतानें चालणें मला योग्य वाटलें नाहीं; आणि शिवाय तात्यांच्या पुढें फार मोठमोठाले उद्योग असल्यामुळें त्यांनीं आपला बहुमोल वेळ या गांवकीच्या भांडणांत न घालवितां वहिवाट पंचांच्या स्वाधीन करून आपण नामानिराळें राहावें. पण हा युक्तिवाद तात्यांना बिलकुल पसंत पडला नाहीं. ते एकदां रागानें मला असें म्हणाले कीं, "हें गांवांतील शिष्ट मंडळींचें भांडण केवळ भांडणाकरितांच आहे. यांच्यापैकीं कोणाच्यानेंहि देवळांचा जीर्णोद्धार व्हावयाचा नाहीं व इतरहि व्यवस्था व्हावयाची नाहीं. शिवाय श्रीबल्लाळेश्वराचे सेवेंत पुराणिकांनीं कसूर करून कसें चालेल! मला हजार कामें असलीं तरी श्रीबल्लाळेश्वराचें काम विष्णु तात्या अंगाबाहेर कधींच टाकणार नाहीं. "

पुढें माझ्या आग्रहास्तव रागारागानें त्यांनीं गांवकीचीं भांडीं पंचांचे स्वाधीन करण्यासहि काढलीं होतीं. पण त्यांचें तानमान पाहून मी त्यांस कळविलें कीं मी एक येथें त्रयस्थ आहें. माझ्या शब्दासाठीं आपण आपल्या मर्जीविरुद्ध कांहीं करूं नये. कोणास ठाऊक आपल्याला सल्ला देण्यास मीच चुकत असेन. यास्तव आपल्यालाच योग्य वाटेल तें करावें.

हें ग्रामस्थांचें भांडण पुराणिकांपुरतें तरी पुढें विकोपास गेलें नाहीं. कारण देवस्थानाच्या जीर्णोद्धारासाठीं पुरेशी रक्कम गोळा होईना. तेव्हां गोळा झाली ती रक्कम पुराणिकांच्या स्वाधीन करून पुराणिकांनींच देवळाच्या जीर्णोद्धाराचें काम आपल्या मुखत्यारीनें पुरें करावें असेंच ठरविणें ब्रह्मवृन्दास भाग पडलें. कारण असा पत्कर घेण्याचें सामर्थ्य गांवकऱ्यांपैकीं इतर कोणाचे ठिकाणीं नव्हतें. पुराणिक श्रीमान होतेच आणि शिवाय त्यांच्याजवळ माणसांचें बळ

मोठें होतें. मेस्त्री, सुतार, गवंडी, पाथरवट, सारा संच त्यांचा कायमचाच होता. याशिवाय आणखी एक 'अंदरकी बात राम जाने' अशी मौज होती. त्याचा बरेच दिवस कोणाला पत्ताच नव्हता.

तात्यांच्या द्वितीय संबंधामुळें ज्या नवरे घराण्याशीं त्यांचा संबंध जडला तें नवऱ्यांचें घराणें मूळचें पनवेलचेंच. तात्यांच्या कारखान्यापासून जवळच त्यांचें घर आहे. तात्यांचे श्वशुर गोविंदबाबा नवरे हे लोणी दूध यांचा व्यापार करीत. त्यांचे सात चिरंजीव आपआपले स्वतंत्र उद्योगधंदे करून असत. या घराण्यांतील विशेषें करून श्री. काशीनाथपंत ऊर्फ तात्यासाहेब आणि गणपतराव ऊर्फ अण्णासाहेब नवरे यांच्या दीर्घोद्योगानें त्या घराण्यास चांगलाच अभ्युदयाचा काल प्राप्त झाला होता. त्या त्यांच्या चालत्या काळांत देवालयांच्या जीर्णोद्धाराचें प्रचंड कार्य त्यांनीं हातीं घेतलें. त्यांनीं ठिकठिकाणच्या अनेक देवळांचा जीर्णोद्धार केला. त्याचेपूर्वीं अगोदर त्यांनीं आपल्या गांवाचा अभिमान बाळगून श्रीबल्लाळेश्वर व श्रीरामजी या दोन्ही देवळांचा जीर्णोद्धार करणाचा पतकर घेतला व त्यांनीं त्या देवळांचे व पनवेलच्या आणखीहि कित्येक देवळांचे जीर्णोद्धार वगैरे कामें केलीं. त्यापैकीं श्रीबल्लाळेश्वर मंदिराचे जीर्णोद्धाराचें कार्य त्यांनीं आपले वडील गोविंदबाबा नवरे यांचे नांवानें केलें व श्रीरामजीच्या मंदिराचा जीर्णोद्धार गणपतराव नवरे यांच्या नांवानें झाला. हे जीर्णोद्धार संवत १९६७ सालीं झाले. व त्यासंबंधींचें ग्रामस्थांचें मानपत्र पुढें कांहीं दिवसांनीं नवरे बंधूंपैकीं एक वडील बंधु रा. कृष्णाजी गोविंद नवरे यांच्या नांवानें देण्यांत आलें. ह्या नवरे बंधूंचे वडील म्हणजे तात्यांचे श्वशूर गोविंदबाबा नवरे हे सन १९११ चे जुलै अखेर निवर्तले. त्यांनीं मरणापूर्वीं दोन दिवस आतुर संन्यास घेतला, व आपल्याला श्रीबल्लाळेश्वर मंदिराचे शेजारीं



श्रीबल्लाळेश्वर रामजी मंदिर,—पनवेल.                [पृ. ४०८

ठेवावें, तेथें समाधि बांधावी, अशी त्यांनीं आपली इच्छा प्रगट केली. याप्रमाणें त्यांनीं अखेरच्या दुखण्यांत आतुर संन्यास शींव येथें घेऊन श्रीगोविंदानंद सरस्वती हें नांव धारण केलें. त्यांच्या देहाचा आतां भरंवसा नाहीं, असें 'पाहतांच त्यांस पनवेलीस घेऊन येतों, पुढील समाधीसंबंधीं ग्रामस्थांची संमति घेऊन ठेवावीं,' अशी नवरे बंधूंची तार तात्यांना आली. तात्यांनीं त्यांना या म्हणून कळविलें. पण ग्रामस्थांचे कानावर ती गोष्ट घालून त्यांची अगर बापटांची अगोदर संमति घेतली नाहीं. कदाचित् या कामीं कोणी विरुद्ध जाणार नाहीं असें त्यांस वाटलें असावें. पण त्याही पेक्षां जास्त संभवनीय कारण देवळें व जागा बापट आपली म्हणतात व बहिवाट पंच आपली सांगणार, या भानगडींत परवानगी मागत बसण्यांत नसता बखेडा मात्र उत्पन्न होईल, म्हणून देवावर भार टाकून तात्यांनीं कोणीला न विचारतां त्यांना या म्हणून तार दिली. त्याप्रमाणें नवरे बंधु श्री. गोविंदानंद सरस्वतींस घेऊन रात्रीं पनवेलीस आले. त्या-वेळीं त्यांची प्रकृति अत्यवस्थच होती. येथें आल्यावर थोड्याच वेळानें त्यांचें शरीर शांत झालें. त्यावेळीं वरील अटकळीप्रमाणें मंदिराजवळ समाधि देण्यास ग्रामस्थ व बापट दोघांकडून हरकत उत्पन्न झाली ! सारी रात्र तोच घोळ पडला ! ज्यांनीं थोड्याच दिवसांपूर्वीं मंदिरांचा जीर्णोद्धार केला त्या नवरे बंधूंची व्यर्थ फसगत होऊन ते संकटांत पडले ! तात्यांच्यांच शब्दांत सांगावयाचें तर " ब्रह्मवृंदांनीं बराच घोळ घालून शेवटीं परवानगी दिली ! * अप्पासाहेब पटवर्धन हे

* हल्लीं त्या समाधीवर तात्यांच्या चिरंजीवांनीं उत्कृष्ट टुमदार दत्तमंदिर बांधलें आहे. त्या मंदिरापुढें दर एकादशीस गीतापाठ अठरा ब्राह्मणांकडून होत असतो. तसेंच पुण्यातिथीच्या महोत्सवहि ब्रह्मवृंदाच्या पंचांचे विद्यमानें नवरे यांचेच खर्चानें उत्कृष्ट साजरा होतो, व श्री दत्तजयंतीचा उत्सवहि होत असतो.

हे समंजसच होते. ते मध्यें पडले आणि गद्दाधर रावजी व मी भाऊसाहेब बापट यांचेकडे जाऊन त्यांची परवानगी मिळविली.

याप्रमाणें तात्या व पनवेलच्या ब्रह्मवृंदापैकीं कित्येक पुढारी यांचा सामान्य संबंध असावा तसा दिलजमाईचा नव्हता हें वरतीं दर्शविलेंच. आतां बेबनावाच्या कांहीं विशेष गोष्टींचाहि ओझरता उल्लेख करून या विषयाचा समारोप करूं.

तात्यांच्या शेजारीं रा. गोपाळराव सोमण या नांवाचे एक संभावित गृहस्थ राहात होते. त्यांची व तात्यांची पागोळ्याखालील जागेवरून आकस येऊन त्यांचा तात्यांच्यावर सन १९०७ चे जून महिन्यांत दावा पडला. हे गोपाळराव सोमण तात्यांचे एक बालमित्र होते. दुसरे त्यांचे एक बाल मित्र रा. धोंडोपंत खरे यांचाहि तात्यांच्यावर एका हवाल्याबद्दल दावा पडला. तिसरे एक तात्यांचे शेजारी वे. गणू घारु जोशी यांच्यावर तर सन १९०५ मध्यें फौजदारीपर्यंत मजल गेली !

सन १९०६ सालीं तात्या काशीयात्रेला गेले. तेव्हां त्यांच्या गैरहजेरींत त्यांच्या कारखान्यांतील कांहीं नौकर मंडळींनीं इतरांच्या मदतीनें नाटकाचे दोन तीन प्रयोग केले. ही गोष्ट तात्या येथें आल्यावर त्यांचे कानावर गेली. नटाचें काम करणें, इतकेंच काय नटाचें काम पाहाणें, हें सुद्धां पाप आहे, असें तात्या मानीत. अर्थात आपल्या नोकरांचें हें वर्तन त्यांस अत्यंत गैर वाटलें. त्यांनीं त्यांच्याकडून सदर गैरवर्तनाबद्दल लेखी खुलासा मागितला व सर्वांना सस्पेंड केलें. या मंडळींत कांहीं ब्राह्मण मंडळी असून त्यांपैकीं एक त्यांच्या आयुर्वेद शाळेंत कांहीं काळ वैद्यकी शिकलेले होते. या तरुण मंडळीनीं कोणीच जबाब न देतां कारखान्यांतील आपल्या नोकऱ्यांवर पाणी सोडलें ! वरील वैद्यकी शिकलेले रा. रामभाऊ आपटे यांनीं गजा-

नन प्रासादिक औषधालय नामक स्वतंत्र उद्योग सुरू केला. त्याच सुमारास तात्यांचे दुसरे एक सर्वांत जुने नोकर रा. गणपतराव जोशी यांनींहि हनुमान प्रासादिक औषधालय काढलेंच होतें.

या एकंदर बेदिलींत तात्यांचा मनस्वी स्वभाव आणि नवयुगाची बेपरवाई या दोहोंचें दिग्दर्शन होतें. कार्यकर्त्या पुरुषाला मतविरोध फारसा खपत नाहीं. आणि आजकालच्या विचारस्वातंत्र्याच्या आणि आचारस्वातंत्र्याच्या काळांत कोणी कोणाला जुमानीत नाहीं. शिवाय वनराज सिंह हा निर्भयपणें एकाकीच राहातो, व मोठमोठाले हत्ती व लहानसहान मेंढरें कळप करून राहतात. त्याप्रमाणें समाजांतील मनस्वी व ओजस्वी पुरुष तुटक राहतात. त्यांच्याशीं स्पर्धा करणाऱ्या कित्येक शिष्टांचे वेगवेगळे कंपू पडतात. आणि बाकीची सारी मेंढवाड्यांतील हुल्लड असते. अगदीं खेडेगांवापासून तों मोठमोठ्या शहरापर्यंत व राष्ट्रां-पर्यंत आज समाजाची अशीच स्थिति आहे. यांत सामान्य जनतेचे ठिकाणीं अज्ञान, अनास्था व औदासिन्य; शिष्टमंडळींच्या ठिकाणीं स्पर्धा व मत्सर; आणि मनस्वी पुरुषाचे ठिकाणीं एक प्रकारचा आग्रही स्वभाव असे दोष उघडच दिसतात. हें विवेचन पनवेलच्याच परिस्थितीला अनुलक्षून केलें आहे असें नसून ही सामान्य मीमांसा आहे. प्रस्तुत तात्यांचें मन सदा व्यग्र ठेवण्यास सभोंवार कोणती परिस्थिति होती हेंच दाखवावयाचें आहे. वरील सर्व प्रसंगीं मी तात्यांचा गुरुबंधु व सल्लागार म्हणून मजबद्दलहि ग्रामस्थांचे अनेक गैरसमज होते. पण वस्तुस्थिति अशी होती कीं तात्यांनीं ह्या सर्व प्रकारच्या बखेड्यापासून अलग असावें, उगाच लोकांत बेदिली व अपकीर्ति वाढवूं नये, असें मी एकसारखें त्यांस सांगत होतों, पण माझा हा भागुबाईपणा त्यांस कधींच पटला नाहीं !

लोकशाहीप्रमाणें राजशाहींशीहि तात्यांची दिलजमाई राहिली नाहीं. तात्यांचें मनारोज्य सन १९०५ सालापासून किंबहुना त्याहि पूर्वीपासून सुरूच होतें. तात्यांचा कारखाना सरकारच्या नजरेंत येऊं लागला होता. सन १९०५ च्या जून महिन्यांत तात्यांनीं पांचशें एकर गुरचरणी जमीन मिळण्याबद्दल सरकारांत अर्ज दिला. तो सरकारनें फेंटाळून लावला. सन १९०५ चे आक्टोबराचे तिसऱ्या तारखेस तात्यांचे व माझे बरोबर श्रीधूतपापेश्वर देवालया संबंधीं बरेच बेतबात झाले. श्री शिवपंचायतनाचीं पांच मंदिरें बांधावीं. त्यांत मध्यें श्रीधूतपापेश्वराचें मंदिर बांधावें; एकशें एकवीस ब्राह्मण तेथें नेहमीं उपासनेला राहतील अशी व्यवस्था करावी. कित्येक [नक्की आंकडा स्मरत नाहीं] ब्राह्मण कुटुंबांची राहण्याची कायमची सोय करून द्यावी. त्यांना प्रत्येकास राहण्यास घर व चरितार्थाला दहा एकर जमीन इनाम करून द्यावी.* त्यांनीं श्रीधूतपापेश्वराच्या सेवेंत श्राधूतपापेश्वर आरोग्यमंदिराचें शुभ चिंतीत निरंतर राहावें, असे त्यांचे अनेक बेत होते. या प्रचंड देवस्थानाकरितां पनवेल जवळच्या आदई, डोंबाळें, या लहान टेंकड्यांवर ते जागा मिळाल्यास पाहात होते; पण त्यांस त्या कामीं स्थानिक मामलेदारांपासून तों वरपर्यंत कोणीहि सरकारी अधिकाऱ्यांनीं सहानुभूति दाखविली नाहीं. उलट सन १९०६ सालीं त्यांचेवर पन्नास रुपये इन्कम टॅक्स होता, तो एकदम १६९ करण्यांत आला. यामुळें तात्या मनांत थोडे चिडले होते. ही गोष्ट एका प्रसंगानें उघड झाली. तो प्रकार असा.

पनवेलीस सरकारी कामगार, वकील व गांवांतील इतर प्रतिष्ठित गृहस्थ यांना घटकाभर एके ठिकाणीं बसण्यास जागा असावी म्हणून

*त्यांच्या मुळच्या आतकर गांवीं वीरेश्वर देवासाठीं अंशतः अशासारखी व्यवस्था आहे.

येथें टेनिस क्लब काढण्याचें येथील त्यावेळचे मामलेदार, कांहीं वकील मंडळी, व आत्मारामशेट आठवणे वगैरे गांवांतील प्रतिष्ठित मंडळींनीं मनांत आणलें. गांवाचे मध्यभागीं तात्यांचे बंधूंनीं घेतलेलें एक घर व त्यापुढें प्रशस्त जागा होती. ती तात्यांच्याच ताब्यांत होती. ती जागा रिकामीच होती. ती टेनिस क्लबाला मिळावी म्हणून कांहीं मंडळी तात्यांकडे गेली. त्यांस त्यांनीं नकार दिला. मी त्यावेळीं बाहेर गांवीं गेलों होतों. मागून मी परत आल्यावर मंडळींनीं तें काम मजकडे सोंपविलें. मीं तात्यांजवळ रद्बदली केली. तेव्हां ते रागानें म्हणाले कीं, " सरकारी अंमलदारांना जर श्रीधूतपापेश्वर कारखान्याबद्दल यत्किंचितहि आस्था वाटत नाहीं, तर त्या सरकारी अंमलदारांशीं मलाहि कांहीं कर्तव्य नाहीं. " मग मी त्यांची उलट अशी समजूत केली कीं, " स्थानिक अंमलदार व ग्रामस्थ हे अगदींच तुटकपणें राहण्याचा हा परिणाम आहे. यास्तव टेनिसक्लबसारख्या संस्थेच्या योगानें हा तुटकपणा हळूहळू कमी होत जाऊन सलोखा राहील. " तात्यांनीं मग शिकस्तीनें जागा देण्याचें कबूल केलें. त्याठिकाणीं अद्यापि टेनिस क्लब सुरू आहे.

तात्यांचें मन बिथरण्याला याहूनहि एक अत्यंत कटु अनुभव तात्यांना आला. वऱ्हाड व इतर प्रांतांतून तात्यांकडे उपदंश व इतर गुप्तविकार झालेल्या रोग्यांचा पत्रव्यवहार बराच वाढत होता. अशा वेळीं त्यांच्या वऱ्हाडच्या एका एजंटानें त्यांस अशी विनंति केली कीं, या अनिष्ट प्रकारास आळा घालण्यासाठीं तात्यांनीं आपल्या व्यवहार-वैद्यकांत कांहीं उपदेशपर भाग लिहावा. या त्यांच्या सूचनेवरूनच असो किंवा तात्यांच्याहि मनांत ही गोष्ट वागत होती म्हणून असो, तात्यांनीं सन १९१२ सालीं "व्यवहारवैद्यक भाग पहिला" नामक त्यांचें औषध घेण्याच्या रीतीबद्दल पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यांत

तरुणांस हस्तमैथुन व विषयासक्ति यासंबंधीं उपदेशपर असा कांहीं मजकूर घातला. तो मजकूर अश्लील आहे अशा आरोपावरून तात्यांचेवर इंडियन पीनल कोड कलम २९२ प्रमाणें सरकारनें फौजदारींत फिर्याद देऊन ता. १६ जून १९१२ रोजीं तात्यांवर एका-एकीं जामीनाचें वारंट बजाविलें व त्यांच्या कारखान्याची झडती घेऊन आक्षेपित पुस्तकाच्या सुमारें दहा हजार प्रति जप्त करून नेल्या! एक पाय तुरुंगांत ठेवून आपला व्यवसाय चालविणारे असे राज-कारणी पुरुष तात्या नव्हते. पण त्यांच्या ध्यानींमनीं नसतां एकदम त्यांच्यावर वारंट आलें असतांहि ते मुळींच गडबडले नाहींत. अगदीं शांत होते. माझ्या पुस्तकांत अश्लील व दोषावह असें कांहींच नाहीं. यास्तव मी निर्दोषी ठरून सुटेनच. फार तर मला हायकोर्टापर्यंत जावें लागेल, असें ते म्हणाले व आपल्या बचावाच्या तजविजीला लागले. माझ्यामार्फत माझे स्नेही श्री. बाबासाहेब शिंगणें यांस त्यांनीं वकीलपत्र दिलें. तसेंच आपल्या बचावासाठीं डॉ. भाजेकर, डॉ. कर्नल कीर्तिकर, प्रसिद्ध वैद्य बाळशास्त्री लागवणकर असे अनेक वजनदार साक्षीदार दिले. त्यावेळचे पनवेलचे प्रांतसाहेब मि. जयकर यांनीं सर्व पुरावा घेऊन व तक्रारी ऐकून तात्यांना दोषीच ठरविलें व त्यांस तीस रुपये दंड केला! दंड पन्नासाचे आंत केला ह्यांत प्रांतसाहेबांनीं सन्माननीय आरोपीवर मेहरनजर केली किंवा आपल्या निकालावर अपीलच न व्हावें अशी सोय पाहिली हें त्यांसच ठाऊक. तरी त्यानें आरोपीचा अपिलाचा हक्क नाहींसा झाला. ही एक अडचणच झाली खरी. त्यावेळीं हायकोर्टांत रिव्ही-

(१) पृ. १४ पॅरे १६६-१६७; पृ. १५ पॅरे १९६; पृ. पॅरा २७१; पृ. ९५ पॅरे ४१५; पृ. ९६ पॅरे १३।१४।१५।१८; पृ. ९८ पॅरे ३०।३१।३३. हे पॅरे येथें स्थल-संकोचास्तव समग्र देतां येत नाहींत.

जन अर्ज करण्यापलीकडे मार्ग नव्हता. पण हायकोर्टांत एकदम अर्ज न करितां ठाण्यास सेशन जज्ज मि. दिक्षीतसाहेब हे होते. त्यांचेकडे अर्ज करावा. ते मराठी भाषा जाणते असल्यामुळें त्यांच्या रेफरन्सचा मिळाला तर फायदा मिळेल, असा मी तात्यांस सल्ला दिला. त्याप्रमाणें ठाण्यास अर्ज दिला. त्याचा फायदाहि मिळालाच. मि. दिक्षीत साहेबांनीं आक्षेपित भाग अश्लील नाहीं असा आपला स्पष्ट अभिप्राय नामदार हायकोर्टाकडे कळविला व आरोपीचे पुराव्यालाहि त्यांनीं योग्य तें महत्त्व दिलें. पुढें सुदैवानें तें काम नामदार हायकोर्टापुढें निघालें, त्यावेळींहि न्या. बॅचेलर साहेबांबरोबर न्या. गणपत सदाशिव राव हे होते. न्या. राव हेहि मराठी जाणणारे एक अत्यंत सात्त्विक जज्ज लाभल्यानें त्यांनीं न्या. बॅचेलर साहेबांची खातरजमा केली. त्यामुळें उभयतां न्यायमूर्तींनीं अखेर असा निर्णय दिला कीं, ही फौजदारी करण्यांत सरकारची चूक झाली आहे. आक्षेपित भाग आक्षेपार्ह नाहीं. यास्तव आरोपीला आम्ही दोषमुक्त करून त्यांचेकडून घेतलेला दंड व जप्त केलेलीं पुस्तकें त्यांस परत द्यावीं, असें फर्मावितों. याप्रमाणें निकाल ता. ५ डिसेंबर सन १९१२ रोजीं झाला. व तारीख २१ डिसेंबर सन १९१२ रोजीं तात्यांच्या जप्त झालेल्या बाराव्या आवृत्तीच्या प्रति त्यांस परत मिळाल्या. याप्रमाणें हें ग्रहण सुमारें सहा महिन्यांनीं सुटलें! त्यासाठीं तात्यांना बराच खर्च झाला. सहा महिने तो एक मोठाच व्याप झाला. वकील, बॅरिस्टर, पुरावा या इलाजांप्रमाणें ओलेत्यानीं देवास प्रदक्षिणा घालणें वगैरे दैवी इलाजही त्यांस करावे लागले. त्यांची परिसमाप्ति तारीख ९ डिसेंबर सन १९१२ रोजीं झाली. यावेळीं तात्यांनीं आपल्या कारखान्यांत कै० त्र्यंबक गुरुनाथ काळे यांस ठेवलें होतें. त्र्यंबक गुरुनाथ ह्यांना रसविद्येचा विशेष नाद होता. ते एक नाणावलेले संशोधक होते. चांगले

लेखक होते. पण ते सरकारच्या अप्रीतींतील होते. त्यांस तात्यांनीं आश्रय दिला, ही गोष्ट सरकारला आवडली नसावी अशी वरील खटल्याची कोणी संगति लावतात. पण तें केवळ अनुमानच. यास आधार कांहीं नाहीं.

एकंदरींत मोठ्या झाडाला मोठा वारा त्याप्रमाणें कर्त्या पुरुषाचे मागें अनेक झटें लागतात! यासाठीं त्यांनीं फारच सावधानता ठेविली पाहिजे. समर्थ रामदास म्हणतात.

**अखंडचि सावधाना । बहुत काय करावी सूचना ॥**
**परंतु कांहीं एक अनुमाना । आणिलें पाहिजे ॥ १० ॥**
**समर्थापासी बहुतजन । राहिला पाहिजे साभिमान ।**
**निश्चल करूनियां मन । लोक असती ॥ ११ ॥**
**म्लेंच्छ दुर्जन उद्दंड । बहुतां दिवसांचें माजलें बंड ॥**
**या कारणें अखंड । सावधान असावें ॥ १२ ॥**

दा. बो. १८।६.





# प्रकरण ३०

## आप्तांचा विरह.

**संसार म्हणिजे सवेंच स्वार । नाहीं मरणास उधार ।**
**मापीं लागलें शरीर । घडीनें घडी ॥**

दा. बो. ३।९।१.

सन १८९३।९४ सालीं तात्या कारखान्याचे चालक झाले, त्यावेळीं त्यांस सहाय्यकारी आप्त, इष्ट मित्र अनेक होते. सखाराम-शास्त्री व कृष्णशास्त्री हे औषधिक्रियेंतील तज्ज्ञच होते. दत्तोपंत सांडू, भाऊसाहेब गुर्जर, बाबासाहेब गोडबोले हे व्यापारांत जाणते होते, आणि एका खालीं एक असे घरचे तिघे बंधु होते. शिवाय मेव्हणे, मामेभाऊ वगैरेहि संबंधी मंडळी बरीच होती. याप्रमाणें तात्यांना कारखान्याला मनुष्यबळाची चांगलीच बळकटी होती. पण निर्घृण काळाच्या ओघाबरोबर हे प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष आधार हळूहळू सुटूं लागले!

तात्यांनीं कारखान्याचीं सूत्रें हातीं घेतल्यावर चार वर्षांनीं सखा-रामशास्त्री एकाएकीं प्लेगनें वारले! कारखान्याच्या दृष्टीनें ती एक मोठीच हानि झाली! तात्यांची भिस्त ज्यांच्यावर जास्त होती.

त्यानंतर दोन वर्षांनीं तात्यांचें कुटुंबही एकाएकींच वारलें ! प्रेमरज्जु नाजुक असली तरी तिचा आधार फार मोठा असतो तो गेला. त्यानंतर तीन वर्षांनीं तात्यांचे एक पुरस्कर्ते दत्तोपंत सांडू, तेहि एकाएकीं प्लेगनें वारले. ! त्यास दोन वर्षें झालीं नाहींत तोंच तात्यांचे वडील असेच विशेष आजार नसतां एकाएकींच निवर्तले ! येथपर्यंतची हकीकत पूर्वीं दिलीच आहे.

कृष्णशास्त्री वारल्यानंतर तीन वर्षें लोटलीं नाहींत तोंच तात्यांच्यावर एक मोठाच आघात आकस्मिक झाला. त्यांचे धाकटे बंधु बापुराव हे तारीख ९ मार्च सन १९०८ रोजीं पटकीचे विकारानें मुंबईस एकाएकीं निवर्तले ! याचा तात्यांच्या मनावर फारच मोठा धक्का बसला. ता. १२ मार्च रोजचे पत्रांत ते लिहितात "......फारच फार वाईट गोष्ट झाली. ईश्वरानें आमच्यांतील हिरा हिरावून नेला ! अशी जोड मिळणें फार कठीण आहे. आजपर्यंत येणारीं संकटें येणार म्हणून आधीं समजत असंत. असें संकट व दुःख माझ्या चवेचाळीस वर्षांत हें पहिलेंच होय. ईश्वरीइच्छेपुढें इलाज नाहीं, हें खरें. परंतु आगबोटीच्या पंख्याप्रमाणें पुनः पुन्हां मनांत उमाळे येतात! पण आतां घरांत मीच वडील असल्यामुळें अज्ञानासारखें किंवा बायकांसारखें रडतां येत नाहीं. ही मोठी अडचणच आली आहे ! असो."

बापुराव मुंबईस आजारी झाले, तेव्हां तात्यांना तार केली. पण तारेंत कांहीं बिघाड झाल्यामुळें तात्यांना तार दुसरे दिवशीं मिळाली. पटकीचा विकार, तो फारच जलद असाध्य कोटींत जातो. मुंबईस डॉक्टरी इलाज सर्व झाले. पण तात्या तेथें जातात तों बापूरावांचे हातपाय गार पडून नाडीहि सुटली होती ! ही गोष्ट तात्यांच्या कोमल मनास फारच लागली ! त्यांनीं तारीख १७ मार्चचे पत्रांत श्रीगुरूंना विचारलें कीं "बापुराव गेले त्यांत माझा कांहीं अन्याय नाहींना ?

पुढें काय काय दुःखदायक घडणार ? " श्रीनीं कळविलें कीं, त्यांचें आयुष्यच संपलें तेव्हां ते गेले. त्यांत तुमचा कांहीं अपराध नाहीं. आतां पुढें तूर्त कांहीं संकट दिसत नाहीं. "

घरचे सखारामशास्त्री आणि वडील व मुंबईचे दत्तोपंत सांडू आणि बापुराव असे गेल्यामुळें कारखान्याचे आधारच तुटल्यासारखें तात्यांस झालें. तारीख १ एप्रिल सन १९०८ चे पत्रांत ते म्हणतात,

" मला उत्साह म्हणून मुळींच वाटत नाहीं. कांहीं करूं नये असें वाटतें. कारखान्याच्या कामाचा त्रास वाटतो. दुसरीं गप्पा गोष्टी हीं कामेंहि आवडत नाहींत. यामुळें एकांत बरा वाटतो. तसेंच जी जी मंडळी मदतीला म्हणून येणार ती कोणत्याना कोणत्या तरी कारणानें येऊं शकत नाहींत, असें वाटत आहे. त्यामुळें कार्य कसें तडीस जाणार हीहि शंका वाटत आहे ! आपण करून कांहीं होत नाहीं. मग उगीच कां बसूं नये ? अशी मनाची प्रवृत्ति झाली आहे ... ... जी होणार गोष्ट ती होऊन गेली. आतां पुढें कांहीं संकटें नाहींत असें श्रींचें आश्वासन आपण कळविलें त्यामुळें जरा बरें वाटत आहे. पण तें किती टिकतें तें पहावें ! "

ह्यानंतर सहासात महिन्यांनीं तात्यांच्या गुरुस्थानीं असणारे भाऊसाहेब गुर्जर निवर्तले ! हे मानलेले गुरु निवर्तल्यावर सुमारें दोन वर्षांनीं तात्यांचे खरे श्रीसद्गुरु व त्यांच्या कारखान्याचाहि आधार काकामहाराज पुराणिक हेहि निजधामास गेले !

श्री सद्गुरु काका महाराजांनीं आपल्या निर्याणाचे पूर्वीं दोनतीन वर्षें अगोदर पुढील तजविजीला आरंभ केला होता. त्यांचा शिष्यसंप्रदाय मोठा होता. आपल्या पश्चात् त्यांची काळजी वाहणाऱ्या कोणा तरी समर्थ पुरुषाची तजवीज लावणें जरूरच होतें. ज्याप्रमाणें श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्य हे आपल्या गादीवर

आपल्या मागें कोणीं बसावें याची तजवीज लावून जातात. त्याप्रमाणें काका तजविजीला लागले किंवा कदाचित् असेंहि असेल कीं, ज्या घराण्यांतून त्यांना सद्गुरुपदाचीं वस्त्रें मिळालीं त्याच घराण्यांत तीं कोणी घेण्यासारखें असेल तर परत करावीं अशी ईश्वराघरची योजना असावी. कांहीं असो. तात्यांचे बापूराव वारले, त्याच वेळीं श्री. काकामहाराजांची प्रकृतिहि मूत्रकृच्छाचे विकारानें फार बिघडून मुंबईचे डॉ. भाजेकर यांस तारेनें बोलावून नेलें होतें. त्यावेळीं तात्यांनीं ज्योतिषाचे आधारें ता. १२।३।१८ चे पत्रांत धोपेश्वरीं त्यांचे एजंट भाऊमामा करंबेळकर यांस असें कळविलें कीं, काकांना आणखी दीड वर्ष तरी भीति नाहीं. त्याप्रमाणें काका त्या दुखण्यांतून उठले व त्यांनीं अखेरच्या दोन तीन वर्षांत पुष्कळच उलाढाल केली. त्यावेळीं त्यांच्या शिष्यवर्गांत त्यांच्या गादीचा प्रतिनिधी होण्यास कोणीच तसा योग्यतेचा पुरुष नव्हता. साताऱ्यास पीरवाडीला श्री संभाजी महाराजांचे घराण्यावर एकाएकीं प्लेगची धाड येऊन एका सपाट्यांत वीस बावीस माणसें मृत्युमुखीं पडलीं ! सारे कर्ते पुरुष निवर्तले. व संभाजी महाराजांचे मुलांपैकीं एक गोविंदराव व दुसरे पुत्र लक्ष्मणराव यांचे चिरंजीव कोंडिबा हेच सर्वांत वडील असे घरांत उरले. कोंडिबा यांस लहानपणापासून दुःख कसें तें ठाऊक नव्हतें व संसाराची जबाबदारी ती काय हेंहि ते जाणत नव्हते. यथास्थित दूध प्यावें, तालीम करावी व खुशाल निष्काळजीपणांत रमावें असें त्यांचें पूर्व आयुष्य सुखस्वास्थ्यांत गेलें. त्यांच्यावर एकाएकीं ही भयंकरच आपत्ति ओढविली ! ते अगदींच गांगरून गेले ! त्यांस काय करावें तें सुचेना. नाथांचे चवथे पुत्र गोविंदराव हेहि प्लेगनें आजारी होते. या संकटांत एका सावकाराचे तगाद्याची भर पडली ! तेव्हां ते अत्यंत फिकीरींत

असतां मळ्यांत एकीकडे एका झाडाखालीं बसून ते रडूं लागले ! त्यावेळीं इकडे धोपेश्वरीं श्री समर्थ सद्गुरु अंघोळीस बसले असतां ते एकदम त्यांच्याजवळील सेवेकरी बाबुराव करंबेळकर यांस म्हणाले कीं,·मला सातार्‍यास जावयाचें आहे. त्याप्रमाणें ते व रत्नागिरीचे दामले वकील व बाबुराव करंबेळकर वगैरे मंडळी सातार्‍यास पीर-वाडीला गेली.

काकांनीं नाथांचे निधनानंतर सातारा सोडल्यावर ते तिकडे कधींच गेले नव्हते. त्यास सुमारें तीस पसतीस वर्षें लोटलीं होतीं. त्यानंतर संभाजी महाराजांचे घरांत काकांची माहिती असलेलीं एक दोनच माणसें हयात होतीं. परकीशी मंडळी पाहून ही कोर्टाची जप्ती आली कीं काय असेंच प्रथम त्यांस वाटलें ! त्यांना काका अद्याप हयात असतील ही कल्पनाहि नव्हती. कोंडिबांना तर कांहींच माहिती नव्हती. पण त्यांची आई सखुबाई हिनें ‘ शास्त्रीबोवा नव्ह का ? ’ असें म्हणून काकांना ओळखलें. व ती म्हातारी काकांस प्रेमभरानें बिलगली ! अनपेक्षित रीतीनें फारा वर्षांनीं शास्त्रीबोवा, आल्याचें पाहून त्यांना फारच आश्चर्य वाटलें, आनंद झाला व धीराहि आला. तो भेटीचा प्रसंग अत्यंत हृदयद्रावक होता ! काकांनीं श्रीसद्गुरूंच्या समाधीचें दर्शन घेतलें तेव्हां ‘ कंठीं प्रेम दाटे। नयनीं नीर लोटे ॥ ’ असा त्यांस प्रेमाचा पूर लोटला ! थोरांचीं माणसें म्हणून काका नाथांच्या घरच्या सर्व मंडळीच्या पायां पडले ! हीं तें त्या मंडळीस फारच अवघड वाटलें. काकांनीं कोंडिबाची गरज भागविली व शिवाय नाथांच्या घरच्या सर्व मंडळीस थोडे थोडे पैसे वांटले. त्या खेपेस काका तेथें राहिले नाहींत. त्यांच्या दुसर्‍या खेपेस सातारच्या पेठेंत रावसाहेब कोल्हटकरांकडे कोणाचें घेणें आहे काय ? याचा तपास काकांनीं केला व तीस चाळीस वर्षांपूर्वीचे देण्याचा ज्यांचेकडे कांहीं सुगावा लागला त्यांचे पैसे

काकांनीं देऊन टाकले ! त्या सावकारांना चाळीस वर्षांनीं दुसऱ्याचें कर्ज तिसऱ्यानेंच फेडण्याचा हा साराच प्रकार अद्भुत वाटला. हें कर्ज नाथांच्या प्रपंचखर्चाकरितां परभारें रावसाहेब कोल्हटकरांनीं काढलें होतें. पण रावसाहेबांनीं साऱ्याच संसारावर तुलसीपत्र ठेवलें असल्यामुळें ते तरी पैसे कोठून देणार ! ते तसेच देण्याचे राहिले. सन १९०८ व सन १९१० सालीं काका कोंडिबांचे आग्रहास्तव अथवा त्यापेक्षां ईश्वराच्या योजनेस्तव साताऱ्यास पीरवाडीला कोंडिबांचे येथें जाऊन राहिले.

काकांची स्वारी पुन्हां गुरुगृहीं जातांच तेथें दर्शनेच्छु मंडळींची एकसारखी गर्दी होऊं लागली. तेथें त्यांच्या चौसोपी घराचे मधले चौकांत तुलसीवृंदावनाजवळ श्रीसंभाजी महाराज यांची समाधि आहे. पण तेथें कोणी सिद्ध पुरुष येईपर्यंत नुसत्या समाधीच्या दर्शनाला कोण जाणार ? काका तेथें गेल्यावर पीरवाडीचे उतेकर पाढलांचें घर म्हणजे एक लग्नघरच सजलें !. तात्या व मी काका तेथें असतां दोन वेळां गेलों होतों. तेथें अनेक शिष्य मंडळी रजा घेऊन येऊन राहिली होती व तें परमगुरूंचें घर म्हणजे सर्वांचें एक कैवल्यधामच झालें होतें. तेथील सर्वच हकीकत येथें देतां येत नाहीं. पण तात्यांच्या गुरुपरंपरेची माहिती देण्यास मागें आरंभ केल्यामुळें थोडें विषयांतर पतकरून तो विषय येथें थोडक्यांत पुरा करीत आहें.

तात्यांप्रमाणें अनेक सांप्रदायिकांनीं पीरवाडीस कांहीं दिवस राहून सत्समागमाचा व सद्गुरुसेवेचा लाभ घेतला. या बाह्यात्कारी नानाविध प्रकारांत जी एक महत्त्वाची घटना बनत होती, ती कोणाच्याच लक्षांत येण्यासारखी नव्हती. श्री. काका तेथें गेल्या-नंतर त्यांनीं असा क्रम ठेवला कीं रोज नित्य नेमानें श्रीनाथांच्या समाधीचें दर्शन घ्यावयाचें व जी जी गोष्ट करावयाची ती कोंडिबांना

विचारून करावयाची. कोंडिबा रोज सकाळीं सुप्रभात गाईचें दूध काढीत व एक प्यालाभर गाईचें धारोष्ण दूध काकांना आणून देत. पूर्वीं श्री. संभाजी महाराज श्री. जालिमसिंगांस रोज दूध नेऊन देत. तसाच हा प्रकार होता. त्यावरून मनोभावानें कांहीं तरी गुरुसेवा घडणें आवश्यक दिसतें. काकांच्या प्रकृतीला दूध मुळींच सोसत नसे असें ते म्हणत. पण रोज सकाळीं कोंडिबांनीं आणलेलें दूध ते नेमानें घेत. कारण कोंडिबांनीं घ्या म्हटलें कीं त्यास नाहीं म्हणावयाचें नाहीं. मग कोंडिबा त्यांच्या पाया पडत. उलट काकाहि माच्यावरून मुद्दाम अगत्यानें वाकून त्यांना वंदन करीत व कोंडिबांची पदधूली आपल्या मस्तकीं धारण करीत. त्यावेळीं काकांच्या चेहेऱ्यावर कांहीं वेगळेंच तेज किंचित् काल दिसून येई! हा जो विधि रोज प्रातःकाळीं होई, त्याशिवाय कोंडिबांचें व काकांचें भाषण किंवा नेहमीं एकत्र बैठक असें मुळींचं नसे. कोंडिबा आपल्या शेतीच्या व्यवसायांत असत. याप्रमाणें १९०८।०९ सालीं दोनतीन महिने व सन १९०९।१० सालीं सहा महिने रोज प्रकार सुरू होता. यावेळचे कोंडिबा म्हणजे एक अगदींच साधे भोळे शेतकरी दिसत. तेथें जमणाऱ्या अनेक शहरी मंडळीशीं दोन शब्द बोलण्याचेंहि त्यांच्या ठिकाणीं त्यावेळीं अवसान नव्हतें. पण काकांचें पाहून, त्यांनीं न सांगतांच, तेथें जाणारी मंडळी समाधीचें दर्शन घेऊन कोंडिबांचेहि पाया पडूं लागली. कारण एकच. ज्यांच्या काका पायां पडतात ते वंद्य होत. पुढें सन १९१० सालीं पाऊसकाल आला असतां काकांनीं सातारा सोडला. त्या सालची श्री गुरुपौर्णिमा चेंबुरास सांडूंचे येथें फारच थाटांत झाली. मुंबईजवळपासची बहुतेक झाडून सारी सांप्रदायिक मंडळी त्या दिवशीं एकत्र जमली होती. चारपांच तास नुसत्या पूजाच सुरू होत्या! रात्रीं काकांचे चिरंजीव वे. शा. नानाशास्त्री यांचें त्यांच्या पुढें सुश्राव्य

कीर्तन झालें. तात्या तेथें आले होतेच. हा शेवटल्या गुरुपौर्णिमेचा योग काकांनीं मुद्दामच घडवून आणला असें दिसतें. गुरुपौर्णिमा करून काका कोंकणांत गेले. ते जातांनाच आजारी होते. त्यांना मूत्रकृच्छ्राचा विकार होता. पण त्याहिपेक्षां त्यांच्या तोंडांत व्रण झाला होता. त्यास दोनतीन वर्षें झालीं होतीं. त्या व्रणाच्या वेदना भयंकर असत. तेथें नुसतें शीत लागलें किंवा पाण्याचा थेंब लागला तरी प्राणांतिक वेदना होतात, असें डॉ. भाजेकरांजवळ काका म्हणाले! पण ही गोष्ट तीन वर्षांत कोणाच्याहि लक्षांत आली नाहीं व त्यानंतरहि अखेरपर्यंत त्यांनीं आपल्याला वेदना होतात असें केव्हांच दर्शविलें नाहीं! इतकी जबरदस्त त्यांची तितिक्षा होती! पुढें तें दुखणें वाढलें. तोंडाला आंतबाहेर पुष्कळच सूज आली. त्यामुळें तोंडच जवळजवळ बंद झालें! मिळतां येईना व बोलतांहि येईना! सुजलेला भाग लाल दिसूं लागला. त्याच्याकडे पाहावेना! दुखणें बळावत चाललें! त्यापूर्वीं सर्व सांप्रदायिकांना दर्शनाचा लाभ मिळावयाचा तो मिळाला. काका आतां या दुखण्यांतून उठणें कठीण असें दिसूं लागलें! त्यांना क्लेश पुष्कळच होत असावेत, पण त्यांनीं कधीं यत्किंचित् 'आई' म्हणून केलें नाहीं! तरी अनेक शिष्यमंडळी त्यांच्या सेवेंत तत्पर होती. श्री. रामकृष्ण परमहंसांचें अखेरचें मुखरोगाचें दुखणें व काकांचें हें दुखणें यांतहि पुष्कळच साम्य आहे.

काकांच्या आजारीपणाची बातमी पनवेलीस पोंचली. श्रींचें दर्शन पुन्हां होतें कीं नाहीं अशी विवंचना मला फारच लागली. मी माझ्या अनेक शंका पत्रद्वारें फेडून घेतल्या. पण दर्शनाची उत्कटता वाढूं लागली. तसेंच संत इहलोक सोडून कसे जातात, तेंहि साधल्यास पाहावें, असेंहि मनास वाटूं लागलें! तात्यांकडे त्यावेळीं गदाधर राव-

जींच्या जावयांस दिवाळसण द्यावयाचा होता. यास्तव त्यांनीं दिवाळीनंतर श्रींचे समाचारास जावयाचें ठरविलें होतें. दरम्यान त्यांच्या स्वास्थ्याकरितां श्रीधोपेश्वरावर रोज लघुरुद्राचें अनुष्ठान तात्यांनीं सुरू ठेवलें होतें. पण मला चैन पडेना. मी तात्यांजवळ कोकणांत काकांचे दर्शनास जाण्याची गोष्ट काढली व तेहि दिवाळसण बंधूंवर सोंपवून येण्यास तयार झाले. आम्ही दोघेहि संवत १९६७ च्या आश्विन अमावास्येच्या दिवशीं सायंकाळीं श्रींचे घरीं जाऊन पोहोंचलों. त्यावेळीं त्यांची तब्येत अत्यवस्थ स्थितींत होती. बोलणें चालणें अशक्यच होतें! त्यांस भ्रम झाला आहे असेंहि म्हणत. पण तात्या तेथें जाऊन त्यांनीं श्रीसद्गुरूंस साष्टांग नमस्कार घातला. मींहि घातला. तात्या काकांच्या माच्याजवळ बसले. मीहि जवळच होतों. काकांना दोघांनीं धरून बसविलें होतें. तात्यांना त्यांनीं ओळखलें. नेहमींच्या पद्धतीप्रमाणें थोडें स्मित करून "केव्हां आलां? कुशल आहे ना?" वगैरे विचारले. काकांच्या त्याहि अत्यवस्थ स्थितींत ते आपल्याच कुशलाची काळजी वाहात आहेत, या विचारानें व त्यांच्या रोगग्रस्त शरिराकडे पाहून तात्यांच्या डोळ्यांतून पाणी आलें! ते तेथून लवकरच उठले. त्यांना रोग्यांचें दुःख पहावतच नसे! त्यांचे धोपेश्वराचे एजंट भालुमामा करंबेळकर यांच्याकडे आम्ही राहिलों. आम्ही गेलों तेव्हां श्री काकांनीं श्री कोंडिबांनांहि तार करून बोलविलें होतें. अमावास्येच्या रात्रीं सर्व निजानीज झाली असतां कोंडिबा त्यांच्या माच्याजवळच निजले होते. त्यांस काकांनीं आपल्या जवळ घेतलें. त्यानंतर त्यांनीं कोंडिबांना काय व कशी दीक्षा दिली, हें कोणासच सांगतां येणें शक्य नाहीं. त्यावेळीं तेथील सर्व मंडळी बाहेर गेली होती. तरी मागून असें समजलें कीं, त्यावेळीं कोंडिबांच्या नेत्रांतून

अलोट अश्रुधारा वाहूं लागल्या. ते काकांस म्हणाले, आपण असेच पीरवाडीस जाऊं. काकांनीं उत्तर केलें कीं रोगाचें मान जास्त आहे; आतां असेंच जातां येणार नाहीं. तरी तुम्ही आतां जा. येथें राहूं नका. तुम्ही येथें असतांना जातां येत नाहीं. तुम्ही जा. तुमच्या मागोमाग येतों." अशा भावार्थीचें त्यांच्या दरम्यान बरेंचसें भाषण झालें असावें.

संवत १९६८ ची बलिप्रतिपदा उजाडली. कोंडिबा राजापुरास गेले. काकांचा श्रम पुन्हां कायमच होता. एक अक्षरहि बोलतां येणें शक्य नव्हतें. इतकी मोठी गांठ गालांत झाली होती. पण जरूरीपुरता त्यांचा श्रम जाई. पहांटे कोंडिबांजवळ बोलते वेळीं त्यांचें दुखणें मुळींच आडवें आलें नाहीं. इतकेंच काय पण अखेरच्या प्रतिपदेचे दिवशीं कोणी एक भाविक बाई लांबून कोठून श्रींकडून उपदेश घेण्याकरितां आली. त्यावेळीं प्रत्येक घटका कशी जाते अशी काकांची तब्येत होती ! जिकडे तिकडे त्यांच्या स्वास्थ्यासाठीं अनुष्ठानें सुरू होतीं. अशा वेळीं त्या बाईला काकांकडे नेणें अगदींच वेडेपणाचें होतें. पण अशा गोष्टींत आड कोण जाणार ? त्यां बाईला थेट काकांपर्यंत जाऊं दिली. तिनें त्यांच्या पायांवर मस्तक ठेवलें. त्यावेळीं काकांच्या तोंडूनें एक अक्षरहि निघणें प्राणसंकटाचें होतें. त्यांतहि ती बाई थोडी बहिरी होती ! काका तसेच माच्यावरून खालीं लवले व बाईला विचारलें तुम्हाला उपदेश घ्यावयाचा आहे काय ? ऐका तर. मग सर्व मंडळी दूर गेली. काकांनीं तिच्या कानांत मंत्र सांगितला. तो तिच्याकडून म्हणून घेतला व ती कृतार्थ झाल्यावर तिला जाण्यास सांगितलें. 'उरलों उपकारापुरता ' तें असें ! त्यानंतर सारा दिवस कठीणच गेला ! रात्र आली. तात्या भालुमामांचे येथें

माधवशास्त्री यांचेजवळ काकांची पत्रिका* काढून दुखण्याचे भवितव्य-तेबद्दल खल करीत बसले. त्यावेळीं काकांचा अंतकाल इतका सन्निकट आला आहे अशी त्यांची कल्पना नव्हती. शिवाय रोग्याची क्लेश-कारक स्थिति त्यांच्याच्यानें कधींच पहावत नसे. यामुळें रात्रीं काकांचें दर्शन घेऊन भोजनास गेल्यानंतर तात्या पुन्हा गुरुगृहीं न जातां भालूमामाचे घरींच त्यांच्या अति आवडत्या ज्योतिष विषयाची चर्चा करीत बसले. माझें मन त्यांत रमेना. मला वाटे आपण समागमासाठीं आलों तर श्रींचे घरींच जास्तींत जास्त वेळ असावें. मी व भालूमामा रात्रीं श्रींकडे आलों. सर्वांचीं जेवणें खाणें झालीं होतीं. काकांचे चिरंजीव भाऊराव व परशुरामभाऊ यांनीं काकांना मागून धरून अर्धवट बसतें केलें होतें. पलीकडे त्यांचे मधले चिरंजीव नानाशास्त्री अध्यात्म रामायणाचे पाठ अनुक्रमानें वाचीत असतां रामलक्ष्मणाच्या निर्याणाचेच अध्याय स्वाभाविक आले! काकांची घालमेल जास्त पाहून दुसरे एक शिष्य चटकन् सोंवळें नेसून रामगीतेचा पाठ जवळच मोठ्यानें म्हणूं लागले! एकानें शामदान




*श्रींची जन्मपत्रिका. जन्मदिनावरून कारखान्याचे पंचांगकर्ते वे. कोल्हटकरशास्त्री ज्योतिषी यांनीं तयार केलेली.

मिती कार्तिक व॥ १३ सोमवार. स्वातिनक्षत्र. शके १७४५

[ मागें शके १७४३ छापलें आहे तें चूक आहे. ]

पेटवून काकांच्या चेहऱ्यावर उजेड केला. तों साराच अद्भुत प्रकार दिसला! त्यांचें तोंड अगदीं मोकळें झालें असून त्यावर रोगाची यत्किंतहि छाया नव्हती! ते एक सारखा 'राम' 'राम' असा स्पष्ट नामघोष करीत होते! त्यांच्या चेहऱ्यावर अपूर्व तेज दिसूं लागलें! त्यांचे अत्यंत तेजःपुंज विशाल नेत्र साफ उघडे असून ते किंचित वर कोणाकडे तरी सारखे पाहात आहेत असें दिसत होतें. त्यांत दिव्यप्रेमाश्रु चमकत होते! मग त्यावेळीं त्यांच्या नजरेसमोर श्रीरामचंद्र पंचायतन दिसत होतें! अथवा श्रीसद्गुरुमहाराज दिसत होते, हें सांगतां येणें शक्य नाहीं. मला त्यांच्या त्या दिव्य नजरेकडे फार वेळ पाहावेना! मृत्यूची पुढें येण्याची छाती नाहीं असें त्यांचे दिव्य विशाल नेत्र सांगत होते!

त्यावेळीं तेथें हजर असलेल्या सर्व स्त्रीपुरुषांनीं काकांच्या चरणांवर गंधफूल वाहिलें व सद्गदित अंतःकरणानें त्यांचें अखेरचें दर्शन घेतलें!!

रात्रींचे सुमारें अकरा सव्वा अकरा वाजले. काकांनीं अखेर तीन वेळां राम! राम!! राम!!! म्हणून मोठ्यानें नामोच्चार केला व तिसऱ्यांदा राम! म्हणतांच शरीर शांत झालें!!!

तो निर्याणप्रसंग कोणीहि न रडण्याइतका गंभीर होता! तेथें अनेक स्त्री-पुरुष मंडळी होती. काकांनीं जिला कडेखांद्यावर वागविली त्या रावसाहेबांच्या आऊताई तेथें होत्या. काकांची मुलगी व मुलगेहि होते. मजसारखी कांहीं मंडळी अनपेक्षित असतां तेथें होती व नेहमींची जवळची कांहीं मंडळी दूर झाली होती. तात्या घोंपेश्वरींच एका हाकेवर राहिले. त्यांच्या प्रीतींतले दुसरे वासुदेवराव सांडू थोडेसे दिवस अगोदर चेंबूरला गेले, त्याहूनहि प्रीतींतले बाबुराव भागवत वकील राजापुरास

गेले. त्याहूनहि श्रेष्ठ श्री. कोंडिबा महाराज ह्यांस श्रींनीं मुद्दाम परत लावून दिलें. फार काय, काकांचें कुटुंब त्यांस अखेरचें औषध लावून शेजारच्या एका खोलींत झोपीं गेलें !

उलटपक्षीं काकांनीं धोपेश्वरीं शरीर ठेवलें व लगेच ते श्री कोंडिबा महाराज मचव्यांत बसत होते, तिकडे त्यांस जणूं पोहोंचविण्यास आले आहेत, असें त्यांसच दिसलें. तसेंच त्यांनीं त्याच रात्रीं आणखीहि कित्येक दूरस्थ शिष्यांचे व इतरांचेहि स्वप्नांत दर्शन दिलें !

यासंबंधीं श्रीसमर्थ रामदास म्हणतातः—

**ज्ञानी मुक्त होऊन गेले । मागें त्यांचें सामर्थ्य चाले ।**
**परंतु ते नाहीं आले । वासना धरूनी ॥ ३ ॥**
**लोकांस होतो चमत्कार । लोक मानिती साचार ।**
**परंतु याचा विचार । पाहिला पाहिजे ॥ ४ ॥**

दा. बो. १०।७

श्री सद्गुरु काकामहाराज पुराणिक निजधामास गेले. याचा अर्थ वाचकांनीं आपआपल्या बुद्धीप्रमाणें व भावनेप्रमाणें करावा. तिकडे धोपेश्वरीं त्या रात्रीं श्रींचे शरीरासन्निध उजाडेपर्यंत आम्ही भजन करीत राहिलों. उजाडल्यावर मी तात्यांना रात्रींचा प्रकार सांगण्यास भालुमामा करंबेळकरांकडे गेलों. तों तात्या व माधवशास्त्री काकांच्या कुंडलीवरून काकांचा मृत्युसमय आहे कीं टळणारा अपमृत्यूच आहे याची वाटाघाट करीतच होते ! तात्या तिकडे न येण्याचें कारण थोर पुरुषांचा अंत पाहूं नये असाहि शिष्टाचार असण्याचा संभव आहे. काका गेले ! हा तात्यांच्या मनावर फारच मोठा आघात होण्यासारखा होता. मला काकांचा सहवास फारच थोडा घडला होता. तरी, मला त्यांचा होणारा विरह दुःसह वाटला ! माझ्या शंकाखोर मनाचें समाधान आतां कोण करील ! ही माझ्या

अंतःकरणाला त्यावेळीं काळजी लागून राहिली ! परंतु तात्या तितके अस्वस्थ झाले नाहींत. कदाचित् असें असेल कीं, एक तर काकांचें वयमान, त्यांचें असाध्य दुखणें व त्यांचें ग्रहमान यांवरून तो प्रसंग लवकर येणार असें त्यांस अगोदरपासूनच दिसत असावें. पण त्याहि-पेक्षां काकांचा देहपात झाला तरी ते सर्वत्र आहेतच आहेत अशी त्यांची दृढभावना होती. यामुळें तात्यांनीं हा प्रसंग मनास विशेष लावून घेतला नसावा. यासंबंधीं तात्यांच्या एका गुरुबंधूनीं कळविलेली हकीकत त्यांच्याच शब्दांत पुढें देत आहें:—

" श्री काकांनीं देह ठेविला नंतर १।२ दिवसांत ते व मी बरोबरच आगबोटीनें मुंबईस आलों. या प्रवासांतील संभाषणांत श्रीकाकांसंबंधीं गोष्टी चालू असतां मी त्यांना विचारलें:—तात्या, आजपर्यंत आपण फार मेहनतीनें, उल्हासानें व चतुराईनें आपला धूतपापेश्वर कारखाना इतक्या भरभराटीला आणला पण त्या कामांत प्रत्येक पावलाला आपण काकांचा सल्ला व आशीर्वाद घेत आलां. कांहींही करावयाचें झालें, तरी तें प्रथम पत्रद्वारें अथवा प्रत्यक्ष त्यांना निवेदन करून त्यांच्या सूचना लक्षांत घेऊन व त्यांची अनुज्ञा मिळाल्यानंतर आपण करीत असा; परंतु काका तर आतां नाहींत, आपले कार्यक्रम तर अजून पुष्कळ शिल्लक आहेत. यासाठीं पुढील धोरणासंबंधानें आपण कांहीं दिशा आंखली आहे काय ?

**तात्याः**—मला हा पेंच पडलेला नाहीं. तुम्हांला तरी असा प्रश्न कां पडावा माझ्या लक्षांत येत नाहीं. तुम्हीं दर्शविलेला संशय कोणाला यावा अशी संदिग्धता काकांनीं शिल्लक ठेविलेली नाहीं. काकांचें ईश्वरत्वच मान्य नसेल तर बोलणेंच खुंटलें.

**मीः**—बरें; ईश्वरत्व मानलें; पुढें काय ?

**तात्याः**—तर मग पुढें सोपें आहे. ईश्वर कधीं नाहींसा होत नाहीं व तो सर्व ठिकाणीं आहेच.

**मीः**—हा वेदांत मला समजलेला नाहीं. आणि आपण म्हणतां हें जर खरें असेल तर आपण धोपेश्वरीं कशाला गेलों? पनवेलला किंवा मुंबईला काय ईश्वर नाहीं? ईश्वर सदैव सर्वत्र आहे तर अडचणी कां येतात? दुखणीं कां येतात?

**तात्याः**—पूर्वकर्मांनीं.

**मीः**—बरें; मग त्यांवर उपाय करायला नको काय?

**तात्याः**—उपायांनीं काय प्रारब्धभोग नाहींसे होतात?

**मीः**—तात्यासाहेब, मग तुमचा आर्यौषधींचा कारखाना कशाला पाहिजे? आणि जगांत सत्पुरुषांचें तरी काम काय?

**तात्याः**—अहो, असें कां म्हणतां? भोग जरी अजीबात नाहींसे झाले नाहींत तरी औषधांनीं व सत्पुरुषांच्या दयेनें ते पुष्कळ कमी होतात व सोसणाराला विसावा काढून धीर येतो; सत्पुरुष पुढील कल्याणाचा रस्ता दाखवितात.

**मीः**—मग हेंच मी विचारतों. काकांचा उपयोग जो तुम्हाला आजपर्यंत झाला, तो पुढें कसा होईल?

**तात्याः**—काकांनीं प्रत्येकाला उपासना लावून दिलीच आहे; ती करीत असलें म्हणजे पारमार्थिक कर्तव्य संपलें. भानगडींचे प्रश्न विचारायला पीरवाडीस श्रीकोंडिबा महाराज आहेतच.

**मीः**—म्हणजे काकांच्याच जागीं ते आहेत? असेंच ना? आणि कांहीं जरूर लागली किंवा उत्कंठा वाटली कीं आपण त्यांच्याचकडे जाणार? यांत चुकत तर नाहींना?

**तात्याः**—मुळींच चुकत नाहीं. मी या बाबतींत शंका काढून काकांनाच विचारून आपली खात्री करून घेतली आहे. कोंडिबांना

विचारून आपला कारभार करीत जा, असें त्यांनीं मला स्वच्छ सांगितलें आहे. ते म्हणाले " तात्या, बोलायची गोष्ट नाहीं, पण ईश्वर कांहीं दोन नाहींत. मी जें सांगायचें तेंच ते सांगतील; त्यांना विचारून काय करायचें तें करीत जा. म्हणजे सर्व ठीक होईल. " अहो, तुकारामांनीं म्हटलें आहे ' आपणासारिखे करिती तत्काळ ' याचा अर्थ काय ? साधु काय आपल्या देहासारखा का चेल्याचा देह करतात ! त्याला स्वरूपाकार करितात म्हणजे आपल्या ईश्वरत्वाला पोंचवितात. ज्ञानदेवांनीं म्हटलें आहे ' शिष्य तोचि गुरु गुरु तोचि शिष्य ! ' आणि असेंच सर्व संतांनीं देखील म्हटलें आहे. राजाचा मुलगा गादीवर बसला म्हणून त्याच्या राजेपणांत काय कमतरता झाली ! "

तात्यांचा हा संवाद सांप्रदायिक दृष्टीनें व तात्त्विक दृष्टीनेंहि बराच महत्त्वाचा आहे. एक राजा गेला व दुसरा आला, तरी राजसत्ता तीच–एकच. जीवन्मुक्तांना विचारलेल्या प्रश्नांचें उत्तर ईश्वरच त्यांचे मुखानें देत असतो. जीवन्मुक्त देत नाहींत. संतांस शरण गेलें असतां संत आपली काळजी घेतात, याचा तत्त्वतः अर्थ ईश्वरच आपली यथायोग्य काळजी घेतो. मुक्तांचे ठिकाणीं लोकसंग्रह, परोपकार, भूतदया, संकटपरिहार, योगक्षेम इत्यादि भावना संभवत नाहींत. ज्ञानोत्तर त्यांच्या सर्व क्रियांचा प्रेरक ईश्वर असतो. तो ईश्वर जीवन्मुक्तांच्या निर्याणानंतरहि भक्तांस प्रिय असलेल्या देहादि उपाधि धारण करून त्यांस दर्शन देतो.

श्री काकामहाराज निजधामास गेले त्या कालाचें महात्म्य काय होतें नकळे. त्याच सुमारास शेगांव येथील श्रीसमर्थ गजानन महाराज, अक्कलकोट येथील श्रीसमर्थ संतरामदादा गंवडी महाराज, कारवार येथील पद्मनाभ स्वामी महाराज हे दिवंगत झाले. त्याचप्रमाणें आणखीहि कित्येक सद्भक्त याच सुमारास दिवंगत झाले.

काकांच्या निर्याणानंतर सुमारें एक महिन्यानें तात्या तापानें थोडे आजारी असतां एका सोमवारीं पहांटे तात्यांना स्वप्न पडलें ती हकीकत त्यांच्याच शब्दांत लिहितों:—" सोमवारीं पहांटे स्वप्न पडलें कीं मी ओटीवर पूजा करीत आहें, तों श्रींची स्वारी [ वांकलेलें स्वरूप नसून सरळपणा अधिक ] एकाएकीं पडवींत आली. धांदलीनें खालीं येऊन नेत्राश्रुयुक्त पायां पडलों. अंगणांत आजीबाई व एकदोन मंडळी अस्पष्ट दिसली. [ प्र. ] आज कोणीकडे येणें झालें ? [ उ. ] तुमचेकडेच. [ प्र. ] आधीं कांहीं कळलें नाहीं ? [ उ. ] होय. चार दिवसांपूर्वींच यावयाचा पण वाटेंत खोळंबा झाला. [ प्र. ] आतां येथून पुढें कोठें आणि केव्हां जावयाचें आहे ? [ उ ] आमंत्रण कोणाचें घेतलें नाहीं. तूर्त येथेंच मुक्काम होणार. [ प्र. ] आणखी मंडळी कोणकोण आहेत ? [ उ. ] आमचा तांगा पुढें आला. मागून दोन तांगे येताहेत. "

" इतक्यांत मीं गालाकडे पाहिलें तों तेथें सूज वगैरे कांहीं नाहीं असें दिसलें. [ प्र. ] गालाचें बरें झालें वाटतें ? [ उ. ] होय. अगदीं बेमालुम झालें. आतां आम्ही येथें बसतों. आपण उद्योगास लागावें."

" अशासारखा संवाद झाला. आणि नंतर १।२ तास काय झालें तें वर्णन करतां येत नाहीं. पण त्याचें प्रत्यंतर मात्र त्याच महिन्यांत मिळालें."

याच पत्रांत तात्या पुढें लिहितात–" येथें माझी तजवीज कशी आहे हें कळविणेसारखें नाहीं. पण श्रींच्या कारखान्याचें मात्र अगदीं ठीक आहे. "

येथें एक महत्त्वाचा मुद्दा चिंतनीय वाटतो. दुर्दैवी मनुष्याचे उद्योगहि अपयशी ठरतात. हा माझा अनुभव आहे. पण तात्यांचा अनुभव याहून वेगळ्या प्रकारचा आहे. कधीं कधीं पतीपेक्षां पत्नी, पित्यापेक्षां पुत्र अधिक भाग्यवान व लौकिकवान् होतो. अशीं उदा-

हेरणें प्राचीन कालपासून आजच्या नवयुगापर्यंत कित्येक आढळतील. त्याप्रमाणें तात्यांपेक्षां तात्यांचा कारखाना अधिक भाग्यवान् होता. तात्यांनीं जन्मभर कष्ट केले, आधिव्याधि सहन केल्या, तप केलें, आणि त्यांच्या श्रीधूतपापेश्वर आरोग्यमंदिरानें सतत चढता भाग्योदय पाहिला. येथें कारखान्याच्या भाग्योदयाचा व तात्यांच्या तपाचा कार्यकारणभाव लावावा, तर तात्यांचे पश्चात् त्यांच्या तपाचे व कष्टाचे अभावीं कारखान्याचा भाग्योदय होतच राहिला.

एका पिढीची पुण्याई दुसऱ्या पिढीस उपयोगी पडते असें आपण म्हणतों. व तसें आपण व्यवहारांत पाहातों. पण कांहीं अंशीं हा आपला भ्रम आहे. एका पिढीची पुण्याई दुसऱ्या पिढीला सुखस्वाथ्याची परिस्थिति आयती प्राप्त करून देईल. पण त्या परिस्थितींत; दुसऱ्या पिढीनें पवित्राचरण ठेवणें, कर्तव्यदक्ष असणें, कुलशीलें राखणें, देहाला कष्टवून मर्दुमकी गाजविणें हे गुण ज्याचे त्याचे; त्याला पूर्व पुण्याई काय करील ? प्राचीनांची पुण्याई आज कोठें कामास येत आहे ? मानवी जीवनाचे विकासाकरितां ज्याच्या त्याच्या प्रारब्धानुसारच त्याला कष्ट अगर सौख्य प्राप्त होतें.

उदयपूरच्या शूर प्रतापसिंहानें भयंकर यातना सहन केल्या आणि राजसिंहानें ऐश्वर्य भोगलें. श्रीशिछत्रपतींनीं व श्रीराजारामांनीं फार कष्ट सहन केले. शाहु महाराजांनीं समशेरीला हातहि न लावतां सौख्य भोगलें. बाजीराव व चिमाजीअप्पा यांनीं हातावर शीर घेऊन रणधुमाळी गाजविली आणि भाग्यशाली शाहु महाराजांनीं राजैश्वर्य भोगलें. या सर्व प्रकारांत कार्यकारणभाव दिसतो. पण तो वस्तुतः नसतो. स्वप्नसृष्टींतील अनुक्रमांत जसा कार्यकारणभाव नसतो, सर्वांचें कारण स्वप्नस्थ पुरुषाची कल्पना, त्याचप्रमाणें या सर्व लौकिक जाग्रत व्यवहारांचें कारण एक ईश्वरेच्छा याहून दुसरें कांहीं नाहीं.

ईश्वर आपल्या नियोजित कार्यास कोणाला तरी वेठीस धरतो, कोंड्याची गोण उचलणारा हमाल आणि साखरेची गोण उचलणारा हमाल यांत व्यापारी कांहीं निवड करितो असें थोडेंच आहे. दोघांचे कष्ट व दोघांची हमाली सारखीच. मग मी साखरेच्या गोणीचा भार वाहिला व लोकांचीं तोंडें गोड करण्यास मदत केली हा अभिमान अथवा आनंदहि व्यर्थच नव्हे काय ? लोकसंग्रहादि कामांचें ओझें साभिमानानें शिरावर धारण करणाऱ्या सूज्ञ पुरुषांनीं याचा विचार करावा. या देहबुद्धीच्या हमालकींत तरतमभाव तो काय ? देहबुद्धि सोडून जडभरतांनीं केलेली भोवीपणाची हमालकी वेगळी !

तात्पर्य, लोकसंग्रहादि परोपकारी महाकार्यांतहि कर्त्यानें कर्तृत्व, भोक्तृत्व, अहंता, ममता बाळगणें व्यर्थ आहे. श्रीधूतपापेश्वर कारखान्याच्या सेवेनें श्रीधूतपापेश्वर कारखान्याचा भाग्योदय झाला असला तरी आपला भाग्योदय केवळ धूतपापेश्वरसेवेनेंच होईल हें खरें मानवी जीवनरहस्य आहे. अनेक प्रकारें अतिशय नुकसान सोसून व आप्तेष्टांचा राग सहन करून अत्यंत परिश्रमानें मीं वाङ्मय-सेवा केली. त्या योगानें मराठींत दहा बरे वाईट ग्रंथ वाढले. पण मला माझें आत्मकल्याण करून घेण्यास या कशाचीच गरज नव्हती. नव्हे हा माझा उद्योग आत्मकल्याणांत प्रत्यवायरूप झाला असेंच मला श्रीसद्गुरु काकांनीं, श्रीजीवन्मुक्त स्वामी महाराजांनीं, व श्री. कोंडिबा महाराजांनीं जें अनेक वेळां सुचविलें त्यावरून म्हणावें लागतें ! पण तात्यांच्या धूतपापेश्वर कारखान्याच्या सेवेच्या जबरदस्त मोहाप्रमाणें माझाहि समाजसेवेचा मोह सुटला नाहीं. तेव्हां, ईश्वरी सूत्रें ज्याच्या त्याच्या प्रारब्धानुसार हालत असतात हेंच खरें !

आतां जोंपर्यंत देहबुद्धि सुटली नाहीं, व प्रारब्धाचा क्षय झालां नाहीं तोंवर ईश्वरेच्छेनें जे व्यवसाय व उद्योग आपल्या हातीं येतील ते

शिवगुरूंस जाऊन त्यांची सेवा म्हणून त्यांनीं प्रेरित केलेल्या शास्त्रमर्यादा संभाळून व प्रारब्धवशात् प्राप्त होणारे कष्ट व दुःख सहन करून, करीत राहाणें हेंच व्यवहारदृष्टीनें मानवी जीवन-रहस्य होय. हेंच कर्म चित्तशुद्धिद्वारां आत्मकल्याणप्रद आहे.

नित्योपासना व चरितार्थाचा अवश्य उद्योग याशिवाय बाकीचें लेखनवाचन सार्वजनिक सेवा इत्यादि हरएक प्रकारचे व्याप मीं शक्य तों कमी करावे, असेंच श्रीगुरूंनीं व इतर सत्पुरुषांनीं मला अप्रत्यक्षपणें सुचविलें. तात्यांनाहि कारखान्याचे सेवेपेक्षां श्रीधूतपापेश्वरसेवेचें महत्व, म्हणजे नित्योपासनेचें महत्त्व विशेष आहे, असेंच सुचविलें. पण असें सुचवूनहि मीं जी वाङ्मयसेवा केली ती त्यांच्या कृपेवांचून मजसारख्या अल्प शिक्षिताकडून होणें अशक्य होतें. त्याचप्रमाणें तात्यांची श्रीधूतपापेश्वर आर्यौषधि कारखान्याची सेवा इतक्या आधिव्याधि संभाळून व केवळ श्रींच्या कृपेमुळेंच शक्य झाली, असेंच तात्या समजत होते. तात्पर्य जों-पर्यंत स्वतांचें निःसंग स्वरूपाचें ज्ञान झालें नाहीं तोंपर्यंत प्रारब्ध हें बंधक आहेच आहे. ह्या प्रारब्ध कर्माचा क्षय होण्यासाठीं देहास कष्टवा-वयाचें तर तें धार्मिक वाङ्मयसेवा अथवा श्रीधूतपापेश्वर कारखान्याची सेवा अशाच सत्कृत्यांत कष्टवावें असाच श्रींचा संकेत दिसतो. असो.

ह्यानंतर तात्यांवर आप्तविरहाचा आणखी एक आकस्मिक आघात झाला! ता. ६ जानेवारी सन १९१२ रोजीं त्यांचे पाठीवरील बंधु गदाधर रावजी यांस प्लेगचा आजार झाला! तेव्हां ते फारच घाबरले. घाबरल्यामुळें त्यांची नाडी आरंभींच एकशेंचाळीसावर गेली! अखेर तारीख ११ जानेवारी सन १९१२ रोजीं त्यांचा अंत झाला! दुखवट्याचे छापील पत्रिकेंत तात्या लिहितात,—" + + + गुरुवारीं त्यांस श्रीधूतपापेश्वर यांनीं आपलें सन्निध नेलें! त्यांचें कुटुंब, वृद्ध

मातोश्री, व कारखाना यांचेवर दुःखाचा डोंगर कोसळून अपरिमित नुकसान झालें ! तें पत्रीं लिहितां येत नाहीं ! इ० ”

मागील प्रकरणांत वर्णिल्याप्रमाणें तात्या आधिव्याधींनीं अगदीं जर्जर होत असतां, त्याहूनहि दुःसह असे निर्घृण कालाचे आघात एकसारखे त्यांचेवर कसे होत आले, तें या प्रकरणांत एकत्र दाखविलें आहे. याप्रकारें त्रिविधतापांस टिकून त्यांनीं श्रीधूतपापेश्वराची उत्कृष्ट सेवा केली. श्रीधूतपापेश्वर कारखाना उत्तम भरभराटीस आणला, व तद्वारां उत्कृष्ट लोकहित साधलें, हें परम आश्चर्य होय !

तात्यांनीं मिळविलेल्या या असाधारण यशाची मीमांसा करितांना असें स्पष्ट दिसून येतें कीं, तात्यांचें जीवनचरित्र ईश्वराधीन तर खरेंच पण तें प्रारब्धानुसार घडत होतें. पण त्यांचे कारखान्याचे जीवनाचा आधार तात्यांच्या प्रारब्धाहून अर्थात् भिन्न व सबळ होता. निदान तात्यांची तरी अशी दृढ समजूत होती कीं कारखान्याचे चालक सर्वाधिष्ठाते श्रीसद्गुरु होते. त्यांची मूर्ति त्यांनीं कारखान्यांत प्रत्यक्ष अधिष्ठितहि करून ठेवली होती. ती मूर्ति हें जसें सर्वाधिष्ठात्याचें एक प्रतीक; त्याचप्रमाणें श्री सद्गुरूंचें चालतें बोलतें शरीर हेंहि त्याहून अति श्रेष्ठ दर्जाचें व अत्यंत उपयुक्त असें एक जणूं प्रतीकच. वस्तुतः सर्वाधिष्ठाते सद्गुरु सदा सर्वत्र विद्यमानच आहेत, अशी त्यांची उज्वल भावना होती. सन १९०९।१० सालीं तात्यांच्या पूजेंतील एकदां शाळीग्राम व एकदां लिंग अथवा बाण नाहींसा झाला त्यावेळींहि तात्यांना हीच भावना समाधानास उपयोगी पडली असावी. त्यांचे अनेक सहाय्यकारी गेले तरी श्रीसद्गुरु श्रीमारुतिरायाप्रमाणें नित्य आहेत, या भावनेचा पाठिंबा त्यांच्या पुरुषार्थास लहान सहान नव्हता. त्यांच्या यशाची व्यावहारिक दृष्टीनें आणखी मीमांसा पुढील प्रकरणांत करूं.

**असो ऐसे सकळही गेले । परंतु येकचि राहिले ।**
**जे स्वरूपाकार झाले । आत्मज्ञानी ॥**

दा. बो. ३।९।५९

---




# प्रकरण ३१ वें.

**यत्ने कृते यदि न सिध्यति कोऽत्र दोषः ।**

**यत्न** करणें हें आपलें काम आहे मग त्यांत यावें तसें यश न आलें तरी त्यांत आपला दोष नाहीं. हें तात्यांचें एक ब्रीदवाक्य होत. सतत अविश्रांत **उद्योग** हें तात्यांच्या यशाचें एक मुख्य कारण आहे. त्यांनीं आपल्या आयुष्यांतील एक घटकाहि व्यर्थ दवडली नाहीं. ते कारखान्यांत स्वस्थ आराम खुर्चीवर अथवा कोंचावर पडले आहेत, असें कोणाला स्वप्नांतहि दिसलें नसेल. आल्या गेल्याजवळ कामाशिवाय कोणाच्या तरी निंदा, कुटाळक्या नाहीं तर इतर गप्पा मारण्यांत त्यांनीं वेळाचा आणि वाणीचा व्यर्थ व्यय चुकून किंवा विनोदानें सुद्धां केला नाहीं. त्यांच्या टेबलावरील काम संपल्यावर ते तेथें बसून राहिले नाहींत. कारखान्यांतील निरनिराळ्या खात्यांतील कामावरील माणसें काय करीत आहेत, यावर त्यांची सारखी देखरेख असे. प्रत्येक ठिकाणीं थांबून विचारपूस करून कोठें चुकत असेल तें ते सुधारून देत. ते क्वचित आपल्या स्टुलावर एकटेच पांच मिनिटें निवांत बसले आहेत, असें कोणाला आढळलें, तरी त्यावेळचें त्यांचें स्वास्थ्य म्हणजे फुल-

चक्राच्या अथवा भोंवऱ्याच्या तीव्र गतींत जें स्थैर्य भासतें तशाचपैकीं तें स्वास्थ्य असे. तेल आणि वात यांचा सतत खर्च झाल्यावांचून दिव्याचा प्रकाश कसा पडावा ! त्याप्रमाणें तात्यांचें तनमन त्यांच्या महत्त्वाकांक्षेच्या ज्योतींत सारखें झिजत असे. म्हणून त्यांची जाहिरातींच्या डंक्यावांचून आसेतुहिमाचल प्रसिद्धि झाली. इतक्या आधिव्याधि संभाळून तात्यांचा हा दीर्घोद्योग इतका अविरत कसा सुरू राहिला, हें मोठेंच आश्चर्य होय !

स्वार्थनिरपेक्ष **त्याग** हा तात्यांच्या यशाचा महत्त्वाचा कारक होय. त्यागाच्या पक्षपातानेंच यश दिगंतीं जातें. यश हें शुभ्र कल्पिलें आहे. कारण शुभ्र वर्णांत सर्व रविकिरणांचा त्याग आहे. तात्यांचा स्वतांचा महिन्याचा खर्च फार तर दहा पंधरा रुपये असेल ! त्यांना स्वतांला वर्षाचा कपड्याचा खर्च पांच रुपये सुद्धां नसेल ! कारखान्यांत फार करून ते उघडेच बसत. त्यांचा एक बनातीचा कोट मी किती तरी वर्षें पाहात होतों. त्यांचा रुमाल आणि पागोटें यांचाहि तोच प्रकार. त्यांचे लहानपणचे जगन्नाथी पंचे त्यांनीं पुढेंहि सोडले नाहींत. ते बहुतेक दुधावरच रहात. दुध व दोन चार फुलके याशिवाय त्यांचा खाण्याचा खर्च कांहींच नसे. त्यांना सुपारीच्या खांडाचेंहि व्यसन नसे. त्यांची बैठक म्हणजे एक साधें स्टूल आणि त्यांचें वाहन म्हणजे बैलाची गाडी. त्यांनीं नाटक साऱ्या हयातींत कधीं पाहिलें नाहीं. चैनीकरितां कधीं कोठें गेले नाहींत. किंवा एक रुपयाहि खर्च केला नाहीं. तात्पर्य, त्यांची राहाणी अशी अत्यंत साधी व काटकसरीची असल्यामुळें त्यांनीं हा जो कारखान्याचा मोठाच व्याप चालविला व याहूनहि फार मोठे व्याप पुढें वाढविण्याचें मनांत आणलें, त्यांत त्यांना सुखोपभोगाची, श्रीमंतीची, कोणत्याहि स्वार्थाची यत्किंचितहि इच्छा नव्हती.

कारखान्याच्या स्वत्वनिवृत्तीला कायदेशीर स्वरूप देण्यास व्यावहारिक व कायदेशीर अडचणी येत होत्या, यामुळें कारखान्याचा कायदेशीर ट्रस्ट होऊं शकला नाहीं. पण त्यांच्या ट्रस्टच्या योजनेंत स्वतः-च्या प्रापंचिक खर्चाला कारखान्याच्या उत्पन्नांतून जो अल्पांश घ्यावयाचा म्हणून त्यांनीं ठरविला होता, तो अल्पांशहि पुरा त्यांनीं कधीं उचलला नाहीं. तात्पर्य, कारखाना श्रीधूतपापेश्वराचा ही केवळ पोकळ भावना नसून कृतींतहि तात्यांनीं ती भावना अखेरपर्यंत कायमच ठेवली. इतकेंच नव्हे तर प्रथम मुख्य एजंट म्हणून व मागून प्रतिनिधि म्हणून त्यांना त्यांच्या व्यवस्थापत्राप्रमाणें जें कमिशन घेण्याचा हक्क होता, तेंहि त्यांनीं कारखान्यांतून पुरें न उचलल्यामुळें त्यांनीं कारखान्यालाच उलट ऋणी करून ठेविलें होतें. सांडूंच्या व्यवहारासंबंधींच्या त्यांच्या अनेक पत्रांत त्यांची स्वार्थनिरपेक्ष भावना वरचेवर दिसून येई. बीजाचा वृक्ष होण्यापूर्वी बीजाला ज्याप्रमाणें आपला नाश करून घ्यावा लागतो, त्याप्रमाणें तात्यांनीं आपल्या ध्येयसिद्धीकरितां आपलें तन-मनधन अर्पण केलें होतें. हाच स्वार्थाचा यज्ञ त्यांच्या यशाला कारण झाला. याशिवाय त्यांचा दानधर्महि विलक्षणच होता. थोडक्यांत सांगावयाचें तर त्यांची मनोराज्यांतील धर्मपुरी ही त्यांची अत्यंत पवित्र यज्ञभूमिच होय.

**प्रेम** हें तात्यांच्या यशाचें तिसरें कारण होय. त्यांच्या धंद्यावर त्यांचें असामान्य प्रेम असे. तें इतकें कीं त्यापुढें त्यांना दुःखाचे आघात किंवा उलट उपासनेचें अगत्य जाणवत नसे. जसें त्यांचें आपल्या धंद्यावर प्रेम होतें. त्याचप्रमाणें त्यांच्या धंद्यामुळें त्यांचा ज्या ज़्या लोकांशीं संबंध येई त्यांच्यावरहि त्यांचें तसेंच असाधारण प्रेम असे. त्यांचे एजंट हे त्यांना घरच्या मंडळींहूनहि अधिक वाटत.

श्रीमंतांपासून गरिबांपर्यंत सर्व ग्राहकांच्या हरएक गरजा पुऱ्या करण्यासाठीं ते सदा दक्ष व तत्पर असत. या दोन्हींहि वर्गापेक्षां रोग्यांचें त्यांना फारच अगत्य वाटे. सर्वांच्याच पत्रांचीं उत्तरें शक्य तों उलट टपालीं गेलीं पाहिजेत असा त्यांचा आग्रह असे. त्यांतहि रोग्यांकडून येणारीं पत्रें उत्तरें पाठविण्यासाठीं ते अगोदर पुढें घेत. रोगी हे स्वाभाविकच उत्तराकरितां उत्कंठित असतील असें त्यांस वाटे. शिवाय त्यांच्याकडे होणाऱ्या पत्रव्यवहारांत उपदंश व इतर गुप्त विकार झालेल्या रोग्यांचींच पत्रें अधिक असत. कारण असे रोगी शरमेनें स्थानिक वैद्यांकडे अगर डाक्टरांकडे जाण्याचें टाळतात. त्यामुळें दुखणें असह्य झालें म्हणजे अनन्यगतिक होऊन त्यांस श्रीधूतपापेश्वर कारखान्यांत पत्रद्वारें औषधयोजना करून घेणें भाग पडे. अशा दुर्वृत्त रोग्यांसहि उत्तरें लिहितांना, ‘वेड्यास वेडें म्हणों नये, वर्म कदापि बोलों नये,’ ह्या समर्थांच्या शिकवणीप्रमाणें ते दुसऱ्याचें मन न दुखवितां त्यांस अत्यंत आस्थापूर्वक औषधी इलाज कळवीत. व वाममार्गानें न जाण्याविषयीं अति सौम्य शब्दांनीं सुचवीत. यामुळें अशा रोगी लोकांस श्रीधूतपापेश्वर कारखाना म्हणजे आपलें मायघरच असें वाटे.

त्यांच्या कारखान्यांत खपणाऱ्या मजूरकरांवरहि त्यांचें असेंच प्रेम असे. त्यांच्या अडीअडचणीला पैसे द्यावे, व त्याबद्दल विशेष तगादा न ठेवतां, हे गरीब लोक कोठून पैसे परत देणार, हीच सहानुभूतीची जाणीव मनांत ठेवून ते त्यांच्याकडून फिटतील तेवढे कामावर पैसे फेडून घेत असत. सारांश,

**दुसऱ्याच्या दुःखें दुखावे। दुसऱ्याच्या सुखें सुखावे॥**
**अवघेचि सुखी असावें। ऐसी वासना॥**

दा. बो १९।७।२३.

अशी तात्यांची सदय व उदारवृत्ति असे.

. :

कार्याच्या उत्साहांत **स्वतःला विसरणें** हें यशाचें चवथें कारण तात्यांचे ठिकाणीं दिसून येई. कारखान्यासंबंधीं कोणत्याहि समारंभांत मोठेपणानें आपण मिरविण्याची त्यांना कधींच आवड नसे. इतकेंच नव्हे तर एवढ्या कारखान्याचा मी लक्षाधीश चालक आणि मालक आहें, ही अहंताहि त्यांच्या मनांत कधींच वागत नसे. हें त्यांच्या अति साध्या वृत्तीवरून दिसून येई. त्यांना कार्याचें महत्त्व फार वाटे. स्वतःचें महत्त्व वाटत नसे. फार काय, आचार्यांनीं त्यांना दिलेली भिषक्चूडामणि ही बहुमानाची पदवी त्यांनीं आपल्या पुस्तकांत आपल्या नांवामागें लावण्याची कधींच आस्था ठेवली नाहीं. श्रीसद्गुरूंस शरण गेल्यानंतर तर खरोखरीच "श्रीधूतपापेश्वर कारखान्याचा चालक यापुढें विष्णु नव्हे," असें ते स्पष्टच म्हणत. आणि तसेंच मनोभावानें मानीत, इतक्या कर्तृत्ववान् पुरुषाच्या ठिकाणीं स्वतःसंबंधीं ही निरहंकार वृत्ति विशेषच कौतुकास्पद वाटते. ते स्वमताबद्दल थोडे आग्रही असत. पण तो **अहंकारच** व्यवहारतः कार्यकारी ठरतो. तो अहंकार व आपण मोठे आहों हा अहंकार यांत महदंतर आहे. लोकमान्य टिळक आग्रही होते; मानी होते; तरी सुद्धां निरहंकारी होते.

**मऊ लोण्याहुनी आम्ही विष्णूदास।**
**कठीण वज्रास भेदूं ऐसे ॥**

हें तेज वेगळें व व्यर्थ अहंमन्यता वेगळी. व्यावहारिक दृष्टीनें या निरहंकार वृत्तीचा व यशाचा कार्यकारणभाव दिसून येत नाहीं. उलट थोडें वैगुण्यच दिसतें. पण हा व्यावहारिक दृष्टीचा भ्रम आहे. विशेष कर्तृत्ववान् पुरुष आपण अंगीकृत केलेल्या कार्यासंबंधीं अहंकार जेव्हां सोडून देतो, तेव्हां तें कार्य सर्वसमर्थ अशा ईश्वरास पुरें करणें भाग पडतें. हीच यांतील गुरुकिल्ली आहे.

तात्यांकडे बाहेर गांवांहून येणारे रोगी, एजंट, ग्राहक इतर पाहुणे, व धंद्यासंबंधीं येणारीं माणसें यांची एकसारखी रीघ लागलेली असे. त्यांचें अंतःकरण आधिव्याधींनीं किती पीडलेलें असे याची कल्पना मागील प्रकरणांवरून वाचकांस होईलच. पण असेंहि असतां त्यांच्या मनाचें गांभीर्य व उत्साह अढळ व कायमच आहे, असें पाहणारांस वाटे. त्यांचे अंतःकरणांतील दुःख पत्रांतून क्वचित् थोडें उघड होई. पण बाह्यतः त्याचा कोणास ठाव लागत नसे. हा कधींहि न आटणारा **उत्साह** हें त्यांच्या यशाचें आणखी एक बलवत्तर कारण होतें.

**निर्भयता** आणि **साहस** हे त्यांच्या यशःश्रेयाचे आणखी महत्त्वाचे भागीदार होत. प्लेगचा कहर उसळला असतां, कारखान्यांत चोहोंकडे उंदीर मरत असतां व माणसेंहि प्लेगनें लागत असतां त्यांनीं कारखान्यांत येऊन काम करीत बसण्याचें कधीं टाळलें नाहीं. त्यांनीं कधींहि प्लेगची लस टोंचून घेतली नव्हती. व कारखान्यांतहि कोणी टोंचून घेतली नव्हती. हें सांगण्यांत लस टोंचणें बरें अगर वाईट हें दर्शविण्याचा हेतु नसून लस टोंचल्यामुळें ते निर्भय झाले नव्हते. स्वभावानेंच निर्भय होते इतकेंच म्हणावयाचें आहे. त्यांना जेव्हां एक दिवस अगदींच एकाएकीं मागील प्रकरणांत लिहिल्याप्रमाणें अश्लील भाषा वापरल्याच्या आरोपावरून वारंट आलें, तेव्हां त्यांची मुळींच चलबिचल झाली नाहीं. त्यांचें धंद्यांतील साहस तर विलक्षणच होतें. एकदां त्यांनीं विलायतेंतून बूचें मागविलीं. त्या मागणींत रुपयांच्या ऐवजीं पौंड किंवा डझन ऐवजीं ग्रोस अशी कांहीं तरी वर्णनांत गैरसमजानें चूक झाली. त्यामुळें पुढें लवकरच एकाएकीं नऊ हजार रुपयांचें बूच मुंबई बंदरांत आल्याची त्यांना वर्दी मिळाली! ती दर्शनी हुंडी त्यांना तावडतोब पटवावीहि लागली ! पण त्यांनीं

ती गोष्ट या कानाची त्या कानास न कळवितां तो बुचांचा डोंगर आपल्या कारखान्यांत बिनबोभाट सांठविला.

**स्वावलंबन** हें तात्यांच्या यशांतलें आणखी एक कारण आहे. त्यांचा सारा कारखाना त्यांच्या एकट्यावर अवलंबून होता. संपत्ति, माहिती आणि शक्ति या बाबतींत ते पूर्ण स्वतंत्र होते. त्यांनीं कोणाचें भांडवल उचललें नाहीं. त्यांचे कोणी एजंट आपली रक्कम कारखान्यांत व्याजू अमानत ठेवा म्हणून त्यांना सांगत, पण त्यांनीं अशा परक्यांच्या अमानत रकमा ठेवल्या नाहींत. आरंभीं त्यांनीं सखाराम शास्त्री व डॉ. गर्दे यांचेपासून काय विद्या संपादन केली असेल तेवढीच. पण त्यांनीं औषधि कारखाना जो उभारला तो बहुतांशानें स्वतःच्या अनुभविक ज्ञानानेंच. ते सर्वांच्या सूचना अगत्यपूर्वक ऐकून घेत व त्यांत जो ग्राह्यांश वाटेल त्याचा लगेच निरभिमानपणें स्वीकारहि करीत. पण ऐकावें जनाचें व करावें मनाचें, असें त्यांचें स्वावलंबन असे.

कारखान्यांतील सुधारलेले, रुळासारखे हातखल व यांत्रिक खल, निरनिराळ्या भट्या, मोठमोठे प्रचंड अर्क व आंसवें यांचीं पात्रें, जमिनी-बरोबर असलेल्या खडकांत लेण्यांसारखीं खोदलेलीं तळघरें, टांक्या हीं सर्व त्यांनीं स्वतः आपल्या कल्पनेनें आपल्या देखरेखीखालीं बनवलेलीं होतीं. पाथरवट, गंवडी, सुतार, लोहार, कासार, कुंभार, बोहरी अशी सर्व मंडळी कारखान्याची बांधलेली असे. कारखान्याला लागणारी हरएक वस्तु कारखान्यांतच तयार झाली पाहिजे, याबद्दल त्यांचा दीर्घ प्रयत्न होता. याचें दिग्दर्शन त्यांच्या मनोराज्यांत झालेंच आहे. त्यांनीं लढाईपूर्वीं इतक्या बाटल्या एकदम मागवून ठेवल्या कीं पुढें चार वर्षें कारखान्याला जास्त बाटल्यांची गरजच लागली नाहीं.

त्यांच्या स्वावलंबनाचा दुसरा प्रकार म्हटला म्हणजे ते आपल्या घरच्या मंडळींवर किंवा नोकरांवर कधींच अवलंबून नसत. त्यांपैकीं कोणी काम करीत नाहीं म्हटल्यास, 'आतांच काम सोडून जा,' असें सांगण्याची त्यांची नेहमीं तयारी असे. औषधि तयार करण्या-संबंधीं वनस्पति कुटणें, खल खलणें अशीं सर्व लहान मोठीं अंगमेह-नतीचींहि कामें त्यांनीं स्वतः केलेलीं होतीं. त्यामुळें त्यांचा हरएक कामासंबंधीं आत्मविश्वास दांडगा असे. ते धंद्याचे संबंधानें परस्वाधीन कधींच झाले नाहींत.

तात्यांच्या धंद्याचें **पावित्र्य** हेंहि त्यांस अत्यंत यशदायी झालें. लोकांच्या व्याधि अल्प आयासानें दूर करण्याचें श्रेय ते संपादन करीत होते. त्यांची व्यवहारवैद्यकमाला आरोग्यरक्षणाचें फारच मोठें पवित्र कार्य अत्यंत बिनबोभाट व सुलभतेनें करीत होती. सांथीच्या रोगांत त्यांनीं मुक्तहस्तानें फुकट औषधें वांटलीं. रोग्याचें क्लेशहरण हें एक पवित्र कर्म आहे असें ते मनोभावें समजत असत व त्यासाठीं परमावधीचे झटत. शिवाय त्यांची श्रीशिवगुरूंच्या ठिकाणची अप्रतिम निष्ठा त्यांच्या उद्योगांत अनुस्यूत झाल्यामुळें त्यांच्या सर्वच व्यवसायास उपासनेची **दिव्यता** प्राप्त झाली होती.

तात्यांची नजर केवळ कारखान्यावरच खिळलेली नव्हती तर जेणें करून आपल्या गांवाचें व आपल्या देशाचें महत्त्व वाढेल त्या गोष्टी घडवून आणाव्या अशी त्यांची व्यापक महत्त्वाकांक्षा होती. पूर्वीं पनवेलीस तारऑफीस नव्हतें. तात्यांनीं विशेष खटपट करून येथें तारऑफिस आणिवलें. त्यावेळीं तारेचें काम पुरेसें मिळेल ही हमीहि त्यांनीं घेतली. तारऑफिस उघडतांच पहिली तार तात्यांनीं मुहूर्त म्हणून श्रीसद्गुरूंना केली! हल्लीं त्या तारऑफिसचा पनवेलला चांगला उपयोग होत आहे.

तात्या जे कोणतेंहि कृत्य हातीं घेत त्यांत त्यांना काय करावयाचें असेल तें ते बरोबर करून मोकळे होत. मग दुसरे आपलें कर्तव्य करोत अगर न करोत. सन १९१० सालीं तात्यांच्या पुतणीचें लग्न पुण्यास झालें. त्यावेळीं तात्यांनीं तेथील विद्वान ब्राह्मणांचा सत्कार फार उत्कृष्ट रीतीनें केला. वसंतपूजेला बरीच वैदिक मंडळी आली होती. पण त्यावेळीं शुक्लपक्ष व कृष्णपक्ष हा वाद निघून मंत्र कोणींच म्हटले नाहींत ! तरी पण त्यामुळें नाराज न होतां आलेल्या सर्व ब्राह्मण मंडळींस मेवामिठाई, फळफळावळ अशी मेजवानी देऊन व दक्षिणा देऊन सर्वांचा यथास्थित मान करण्यांत तात्यांनीं आपलेकडून कमतरता होऊं दिली नाहीं.

तात्यांबद्दल पुण्याचे सुप्रसिद्ध वैद्य नानलशास्त्री म्हणतात, "मुहूर्तं ज्वलितं श्रेयः न च धूमायितं चिरम्।" श्री. पांडुरंग वामन काणे हे इतकीच टीका करितात कीं, "तात्या फार श्रम करीत हांच त्यांच्यांतील दोष होय." तात्यांचे मेव्हणे श्री. आत्मारामपंत यांचें म्हणणें असें कीं ' साधारण उद्योगी मनुष्यानें दीडशें वर्षांत जितकें काम शरीराकडून करून घेतलें असतें तितकें काम फक्त पन्नास वर्षांत त्यांनीं करून घेतलें." नगरचे श्री. फडके अशी एक मौजेची आठवण सांगतात कीं "तात्यांच्या कारखान्यांतील यांत्रिक खलांच्या एंजिनचा आवाज निघूं लागला तें तात्यांना दिव्य संगीत वाटलें." असें औद्योगिक प्रेम असल्यावर मनुष्याला कितीहि श्रम पडले तरी ते हलकेच वाटतील, हें उघड आहे. नगरचे श्री. गुणे वैद्य हे माहिती देतात कीं, "तात्यासाहेब हे आयुर्वेदीय आयौंषधि कारखान्याचे किंवा कल्पनेचे आद्यजनक होत," तात्यांचे एक एजंट श्री. धर्मपुरी यांचा आशय असा कीं, ध्येयनिष्ठ लोक फक्त ध्येयाकरितां येतात व ध्येय प्रस्थापित झालें कीं अंतर्धान पावतात. यासाठींच तात्यांचें जीवन

होतें. सोलापूरचे सुप्रसिद्ध डॉ. रानडे यांचें म्हणणें तात्या जर आणखी कांहीं वर्षें असते तर त्यांनीं आपलें मनोराज्य खचित खचित प्रत्यक्ष घडवून आणलें असतें. तात्यांसंबंधीं ज्यांना विशेष माहिती होती अशा कांहीं अनुभवी गृहस्थांचे जे वर थोडक्यांत अभिप्राय दिले आहेत त्यावरून तात्यांची कार्यनिष्ठा व उद्योगावरील प्रेम चांगलेंच सिद्ध होतें.

यशाची मीमांसा या विषयावरील स्वामी रामतीर्थ यांचे विचार नजरेपुढें ठेवून ते तात्यांच्या चरित्रास कसे लागू पडतात, तें वरतीं दाखविलेंच आहे. तात्यांचें अंतःकरण त्यांच्या ध्येयाशीं एकजीव झालें होतें. त्यांच्या उद्योगासंबंधीं व्यावहारिक आकांक्षांना पुढें कदाचित् फांटे फुटले असते; पण त्यांच्या हयातींत तसें घडलें नाहीं. त्यांच्या पत्रव्यवहाराच्या नमुनेदार शिस्तीनें ज्याप्रमाणें दूरदूरच्या लोकांचीं अंतःकरणें सहज आकर्षित झालीं, त्याचप्रमाणें त्यांचें आवडतें पनवेल बंदर जलमार्गानें व्यापारी मालाची ने-आण करण्यास विशेष सोयीचें झालें. तसेंच पनवेल येथील मजूरकर व नोकरवर्गहि त्यांस बराच सवलतीनें मिळाला. धंद्यांतील काटकसर ते फार दक्षतेनें संभाळीत, उदाहरणार्थ आसवारिष्टांचा चोथा वाळवून ते तो भट्टींत सरपणासारखा वापरीत व त्याची राख व व कारखान्यांतील इतर गंदळ ते शेतांत खत म्हणून टाकीत. अशींहि अनेक कारणें त्यांस यशःप्राप्तीस साहाय्यकारी झालीं. विस्तारभयास्तव त्याची अधिक चर्चा येथें करितां येत नाहीं.

ह्या चरित्ररहस्यात्मक उपांत्य प्रकरणांतच चरित्राचें किंचित चिकित्सापूर्वक सिंहावलोकन करणें योग्य वाटतें. हें चरित्र गंगा-जमनी आहे. यांत कर्म आणि भक्ति यांचा मिलाफ आहे. प्रपंच आणि परमार्थ ह्या दुथडीनें वाहणारा हा विचारप्रवाह आहे. यांत

पुराणिकांचें चरित्र व कारखान्याचें चरित्र दोन्ही गुंफलीं आहेत. प्रथम आपण तात्या पुराणिक यांच्या चरित्रापुरता विचार करूं. पुराणिकांच्या घराण्यांतील तीन पिढ्या यांत येतात. त्यांतील मधल्या पिढीचे जे कर्तेपुरुष तेच या चरित्राचे नायक होत. ते जसे प्रापंचिक होते तसे एक उपासक होते. ते जसे कारखानदार होते तसेच ते एक परमार्थसाधक होते. कारखानदार म्हणून त्यांचे चरित्राचे सन १८९३ ते १९०० हें उद्योग कांड, सन १९०० ते १९०७ हें उपासनाकांड आणि सन १९०७ ते १९१४ हें अभ्युदय-कांड असे सारखे तीन भाग पडतात. साधक म्हणून त्यांच्या चरित्रा-कडे पाहिल्यास सन १८६४ ते १८८१ हे श्रवण अथवा शिक्षण, सन १८८१ ते १८९८ हे मनन, सन १८९८ ते सन १९१४ हे निदिध्यासन, असे सुमारें १६।१७ वर्षांचे तीन सारखेच विभाग पडतात. निदिध्यासनानंतर मुक्तीच मिळावयाची परंतु त्यानंतर ते इहलोकींचे रंगभूमीवरून जणूं एकांतांत शिवभक्ति करण्या-साठीं अंतर्धान पावले. भृगुसंहितेप्रमाणें ते आणखी जगते तर भक्तिमार्गांत त्यांनीं इहलोकीं किती प्रगति केली असती तेंहि कळून येतें. पण तो योग येथें आला नाहीं. तरी पण इतकें खरें कीं, आरंभीं त्यांची तनु–मन–धन हीं कर्तबगारीचीं तिन्ही ' करणें ' अगदींच कमकुवत असतां श्रवण–मनन–निदिध्यासन या साधनानुष्ठानें श्रीगुरुकृपेनें त्यांनीं फारच मोठी मजल मारली यांत शंका नाहीं.

**असाध्य तें साध्य करितां आयास ।**
**कारण अभ्यास तुका म्हणे ॥**

या त्रिविध दृष्टीनें हें चरित्र अत्यंत उद्बोधक झालें आहे. निरक्षर रामकृष्ण पुजाऱ्याचे श्री रामकृष्ण परमहंस कसे झाले, वाटमाऱ्या वाल्याकोळ्याचे वाल्मिक ऋषि कसे बनले, विषयासक्त मोहनदासास

विरक्त महात्मा हें पद कसें लाभलें, ही कथा कोणासहि उद्बोधकच वाटेल.

श्रीधूतपापेश्वर आर्यौषधि कारखान्याचाच विचार केल्यास त्याचे कालविभाग आणि विषयविभाग सन १८७२।७३ ते १८९२।९३ ही गर्भावस्था, सन १८९३।९४ ते १९१३।१४ बाल्यावस्था व सन १९१३।१४ ते सन १९३३।३४ तारुण्य. असे तीन वीस वीस वर्षांचे मानतां येतात. पुराणिकांच्या पाहिल्या पिढीनें पेरणी केली, दुसऱ्या पिढीनें उत्तम जोपासना केली, आतां खरी वाढ आणि सफलता तिसऱ्या पिढींतच कशी काय होते तें पहावयाचें आहे. गर्दी व सांवट हे वाढीचे दोन मोठेच प्रतिबंध असतात. तसेंच जोरकस खतें, अंतस्फूर्ति, आणि मशागत यांचा अभाव हा सफलतेस धोका असतो. लहान मूल जाणतें होईतोंच त्यास फार जपावें लागतें. तें जाणतें झाल्यावर वयांत येईपर्यंत विशेष जपण्याचें कारण नसतें. वयांत आल्यानंतरचा योग्य विवाह व सुप्रजाजनन हा समय पुन्हां विवेकाचा व सावधपणाचा असतो. तात्यांच्या कल्पनेप्रमाणें तो सावधपणाचा व कर्तृत्वाच्या तारुण्याचा काळ यापुढें आहे.

प्रपंच कुटुंबाचा असो अगर संस्थेचा असो, प्रपंचदृष्टीला सुवर्णाची आवश्यकता आहेच. ‘ प्रपंचीं पाहिजे सुवर्ण ! ’ तात्यांना इ. स. १८७२ सालीं मुंजीच्या वेळीं मिळालेलें एक तोळा सुवर्ण वैद्यकी धंद्यास भांडवल देऊन या आवश्यकतेची पूर्तता करण्याचा अल्पारंभ झाला. याच ( सन १८७२ सालीं ) संवत १९२९ च्या कार्तिक शुद्ध प्रतिपदेला पुराणिकांचा आर्यौषधिकारखाना प्रसिद्ध झाला. पुढल्या कार्तिक शु. १० ला अरुणोदयांत आर्यौषधि कारखान्याची पहिलीच जाहिरात फडकली. हाच व्यापाराचा आरंभ होय.*

*यापूर्वीच्या कारखान्याच्या कांहीं पुस्तकांतून सन १८७८ हा आरंभकाल चुकीनें छापला गेला आहे.

या प्रमाणें पुराणिक उपनामक एका वैदिक घराण्यांत जन्मास येऊन प्रपंचदृष्टीला जरूर असलेल्या धनाची जी वाण होती त्याची आयुर्वेदाचे सेवेनें त्यांनीं विपुलता करून सोडली. राकेलच्या फुटक्या जस्ती डब्यांतून धंद्याला आरंभ केला आणि लहानशा खोल्याएवढाल्या प्रचंड पितळी टाक्यांतून भर भरून आसवारिष्टें लोकांना पुरविलीं. लाखों रुपयांच्या इमारती उभारल्या व शिवाय त्यांनीं दोन्ही हातांनीं किती रुपये धर्मादायास लावले असतील तें कोणीं सांगावें !

धनाच्या उणिवेप्रमाणें तात्यांचें मनही अति हळुवार होतें. मनविरोधादि लहानसहान आघातांनींहि त्यांचा जो मनःसंताप होई तो त्यांस असह्य होई. एकदोन वेळां तर त्या मनःसंतापाची मजल भ्रम उत्पन्न होण्यापर्यंत गेली आणि अखेर त्यांच्या मृत्यूला निमित्तकारण मनःसंताप हेंच अंशतः झालें ! अशा अधु मनाला उपासनेच्या बळानें त्यांनीं समर्थ बनविलें. याप्रमाणें दारिद्र्यरोगावर व्यापार हें रसायन त्यांनीं बनविलें, मनः-संतापावर चंद्रशेखराची उपासना ही मात्रा खलली. ' शरीरमाद्यं-खलु सर्वसाधनम् '. प्रपंचदृष्टीला लागणाऱ्या सुवर्णप्राप्तीसाठीं जरूर ते अविश्रांत परिश्रम करितां यावे, व मनःसंयमनाला लागणारें बल असावें, ह्यासाठीं शरीर बळकट व निरोगी पाहिजे, तेंहि तात्यांजवळ नव्हतें. एका पुरुषाला जेवढ्या व्याधि असूं शकतील तितक्या व्याधि त्यांना होत्या, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं ! पण त्यांनीं आपल्या कर्मीतील अहंकार काढून घेऊन त्या अखंड कर्माला श्रीधूतपापेश्वर सेवा हें रूप दिलें. त्यामुळें त्यांना ईश्वरानें दिव्यौषधि बनविण्याचें सामर्थ्य देऊन रोगांच्या आघातांपासून आपल्या व इतरांच्या तनूंचें रक्षण करण्यास समर्थ केलें. तात्पर्य, व्यावहारिक समृद्धीसाठीं व्यापार, मानसोन्नतीसाठीं उपासना,

आणि शरीररक्षणासाठीं दिव्यौषधि या तिन्ही गोष्टी ज्या चरित्रांत सिद्ध झालेल्या आपल्याला दिसतात, तें चरित्र उद्बोधक नव्हे काय?

व्यावहारिक दृष्टीनें लिहिलेल्या चरित्रांत धर्म, अर्थ आणि काम ह्या तीनच पुरुषार्थांचा विचार प्रथम कर्तव्य असतो. पण हे तीन पुरुषार्थ अशा रीतीनें सिद्ध व्हावयास पाहिजेत कीं जेणेंकरून चवथा परम पुरुषार्थ जो मोक्ष त्याचाहि अनुभव घडणें सुलभ होईल. वस्तुतः मोक्ष हा पुरुषार्थ सिद्धच आहे. तो साध्य नव्हे. पण तो सिद्ध असूनहि त्याचा अमृतानुभव येण्यास अर्थ आणि काम अथवा कनक आणि कांता हे दोन जबरदस्त प्रत्यवाय आहेत. कनक आणि कांता हीं अर्थ आणि काम या दोन पुरुषार्थांचीं ठळक उदाहरणें आहेत. त्या पुरुषार्थांचें स्वरूप कनक आणि कांता याहून व्यापक आहे. हे दोन्ही पुरुषार्थ धर्मानुरोधानें सिद्ध करण्याचे जे प्रयत्न त्याचेंच नांव व्यावहारिक सदाचार. आणि ते अधर्मानें सिद्ध करणें अथवा ते प्राप्त झाले असतां अधर्मानें वागणें ह्याचें नांव व्यभिचार किंवा अनाचार. तात्यांनीं आपल्या सदाचारानें चवथ्या पुरुषार्थाचे वर्गांत जाण्याची लायकी संपादून केली. प्रथम काम ह्या पुरुषार्थापुरताच विचार करितां तात्यांचीं कांहीं व्रतानुष्ठानें कामनिक असत हें खरें. पण कामनाविरहित असेंहि पुण्यकर्म त्यांनीं पुष्कळच जोडलें. शिवाय संकटपरिहाराकरितांहि व्यावहारिक इलाज करण्यापेक्षां शक्य तर दैवी इलाज करणें हें अधिकच श्रेष्ठ ठरेल. कारण त्या योगानें मनांत श्रद्धा व भाव उत्पन्न होऊन मनाला ईश्वरोपासनेचें वळण लागतें. निष्कामकर्मयोग हा शब्दप्रयोग विशेषेंकरून शास्त्रीय कर्मांनांच लावतात. तींच कर्में निष्काम आचरण करतां येणें शक्य असतें. औषधिक्रिया आणि व्यापार असलीं व्यावहारिक कर्में वरील अर्थानें निष्काम होऊं शकत नाहींत. किंवा

त्यापेक्षां असें म्हणतां येईल कीं कोणत्याहि शास्त्रीय, लौकिक आणि स्वाभाविक कर्माचें जें साक्षात् फल त्या मुख्य फलासंबंधीं कामना धरणें अयोग्य नव्हे. किंबहुना अशा प्रेरक कामनेवांचून कर्मच संभवणार नाहीं. अबुद्धिपूर्वक होणाऱ्या रुधिराभिसरणादि कर्मांत सुद्धां आरोग्याची अपेक्षा असतेच. त्याचप्रमाणें बुद्धिपुरःसर होणाऱ्या शुद्ध शास्त्रीय कर्मांतसुद्धां चित्तशुद्धीची अपेक्षा असतेच. या अपेक्षांनीं कर्माची निष्कामता मोडत नाहीं. व्यावहारिक आणि लौकिक कर्मांत याचप्रमाणें कर्माचे साक्षात् फलाची अपेक्षा असणें भागच आहे. त्यावांचून कर्म संभवणार नाहीं. परंतु कर्माच्या त्या मुख्य परिणामरूप फलाशिवाय भोक्तृत्व, कर्तृत्वादि एषणांचे योगानें जीं अन्य फलें अपेक्षित असतात, तींच कर्मांतील निष्कामता मोडण्यास कारण होतात. तात्यांची औषधि-क्रिया व व्यापार हीं लौकिक कर्में होत. पण या क्रियांचा कर्ता विष्णु ही व्यक्ति नव्हे, अशी त्यांची शुद्ध भावना होती. आतां स्त्रीविषयक जो काम त्यासंबंधींच्या धर्मबंधनांतहि ते अत्यंत शुद्ध व प्रामाणिक होते. या प्रामाणिकपणाची इभ्रत व तेज संसारांत वेगळेंच असतें.

तिसरा पुरुषार्थ जो अर्थ त्यासंबंधीं विचार पाहतां, तात्यांनीं जो अर्थसंचय केला तो कोणालाहि दुसऱ्यांना गरीब करून केला नाहीं. गरीबांचें त्यांनीं कल्याणच केलें. वैद्यांनां वाटेल तें औषध अल्प किंमतीस देऊन त्यांनीं त्यांची उलट उत्तम सोयच केली. हजारों रोग्यांस अल्पमोबदल्यांत रोगमुक्त केलें. शेकडों एजंटांची, नोकरांची व मजुरांची चरितार्थाची सोय लावून दिली. आणि शिवाय सत्यधर्मानें व्यापारांत मिळालेल्या पैशांतून फक्त चरितार्थापुरता अल्पांश घेऊन बाकी सारी जिनगी त्यांच्या खाजगी धूतपापेश्वर संस्थेची असें मानलें. अशा रीतीनें त्यांचा अर्थ पुरुषार्थ धर्माचे अनुरोधानेंच सिद्ध झाला.

धर्म ह्या पुरुषार्थाबद्दल तर तात्या अत्यंत दक्ष असत. त्यांचें प्रत्येक कृत्य धर्मशास्त्राला धरून असे, निरनिराळे विधि, संस्कार, मुहूर्त यांच्या पालनांत ते अत्यंत दक्ष असत. धर्म हा त्यांचा जीव कीं प्राण होता. मोक्ष या पुरुषार्थापेक्षांहि धर्म हा पुरुषार्थ त्यांस जास्त जिव्हाळ्याचा व व्यवहार्य असल्यामुळें अधिक प्रिय वाटे.

भगवद्गीतेंतील कर्मपंचकांत ( अ. १८।१४ ) दैव हें पांचवें आहे. येथें दैव याचा अर्थ इंद्रियांच्या देवता अथवा कर्मदेव असा आहे. या देवांना अनुकूल करून घेण्याचें साधन धर्म हें आहे, ही गोष्ट आधुनिक विसरतात. आणि संध्या, पूजा, देव, धर्म, व्रतें, अनुष्ठानें करून काय करावयाचें आहे, तें सर्व व्यर्थ थोतांड आहे, असें कांहीं एक विचार केल्यावांचून बोलतात. पण श्रीसद्गुरु तात्यांकडून सूर्यादि देवतांचीं व्रतें करवून घेत. जी गोष्ट देवतांची तीच ग्रहांची आहे. सूर्याचे मानवी जीवनावर होणारे परिणाम भौतिकशास्त्रज्ञहि कबूल करितात. तीच गोष्ट चंद्राची आहे. भरती ओहोटी व तदनुसार रक्ताचें अभिसरण, रोगाचें कमजास्त प्रमाण हा तर प्रत्यक्षाचा अनुभव आहे. कांहीं त्वग्विचार व मानसिक रोग अमावास्येस व पौर्णिमेस कां वाढतात हा विचार करण्यासारखा आहे. या चरित्रांत श्रीसद्गुरु काका पुराणिक, तात्या पुराणिक, व त्यांचे चिरंजीव श्री. नानासाहेब यांच्या कुंडल्या व त्यांच्याबद्दलचीं भविष्यें दिलीं आहेत. त्यांत न जुळणाऱ्या गोष्टींपेक्षां जुळणाऱ्याच गोष्टी अधिक आहेत असें दिसून येईल. त्या कां जुळाव्या हें एरव्हीं कांहींच सांगतां येत नाहीं. तात्पर्य, आपल्या संस्कृतीप्रमाणें आधिव्याधींच्या चिकित्सेचे जे निरनिराळे प्रकार आहेत व अपायावर जे उपाय सांगितले आहेत ते व्यावहारिक दृष्टीनें सर्व चिंतनीय आहेत. परमार्थतः कोणताहि कार्यकारणभावच संभवत नाहीं